२०६२. धन्य तोचि देश जेथें संतवास । तापत्रयदोष जाती सत्य । १ ।
धन्य मातापिता उभयकुळशुद्धता । तोचि भजे संतां निर्धारिंसी । २ ।
तीर्थरूपी जळ विलंबें करी निर्मळ । संतदर्शनें तत्काळ शुद्ध होती । ३ ।
धातुमय मूर्ति चिरकाळें फळती । संतांचे संगतीं निजस्वार्थ । ४ ।
नामा म्हणे मुक्ति जे नर इच्छिती । संतांचे संगती धरती भाव । ५ ।

२०६३. बहुरूप्या ब्राह्मणा पडियेलें मित्र । दोहींचें तें गोत्र एक झालें । १ ।
संग तोचि बाधी संग तोचि बाधी । कुसंग तो बाधी नारायणा । २ ।
वेश्या पतिव्रते पडियेला शेजार । दोहींचा आचार एक झाला । ३ ।
नामा विष्णुदास सत्संगति बोधला । आत्मा हा लाधला पांडुरंग । ४ ।

२०६४. जायाचें सोंवळें जायाची ही चोळी । जायाची गरसोळी तीहि जाय । १ ।
जिणें हें जायाचें जिणें तें जायाचें । तें पैल कोणाचें देणें आहे । २ ।
जायाचा आचार जायाचा विचार । जायाचा भ्रतार क्षणभरी । ३ ।
नामा म्हणे अवघें जिणें तें जायाचें । संतसंगतीचें सुख घ्यावें । ४ ।

२०६५. संतसंगतीचें काय सांगूं सुख । आपणा पारिखें नाहीं तेथें । १ ।
साधु थोर जाणा साधु थोर जाणा । साधु थोर जाणा कलियुगीं । २ ।
इहलोकीं तोचि सर्वांभूतीं सम । शरीराचा भ्रम नेणे कदा । ३ ।
नामा म्हणे गाय दूध एक सरे । साधु निरंतर वर्ते तैसा । ४ ।

२०६६. होईन संतांचा वोंळगणा । दास डिंगर पोसणा । १ ।
प्रेम द्यावें नारायणा । भूतदया परिपूर्णा । २ ।
संतचरणींचे रज । हेंचि सर्व तीर्थ मज । ३ ।
सेवीन संतउष्टावळी । तेणें पवित्र माझी कुळी । ४ ।
राखेन संतांचें मी द्वार । तें मज वैकुंठाहुनि थोर । ५ ।
नामा म्हणे पंढरीनाथा । न मागें आन सर्वथा । ६ ।

२०६७. पूर्ण कृपा केली देवा । दिधली पादपद्मसेवा । १ ।
पापें पळालीं पळालीं । नामकीर्तनकल्लोळीं । २ ।
रंगमाळा जागरणीं । तेथें मुक्ति वाहती पाणी । ३ ।
जन्म वैष्णवकुळीं द्यावा । घडो संतांचि हे सेवा । ४ ।
नामदेवाची आवडी । संतचरणीं देतो बुडी । ५ ।

२०६८. थांऊनियां मिठी घालीन संतचरणीं । सांगेन वचनीं मनिंचें गुज । १ ।
विठोबाचे गांवा न्यारे एकवेळां । फार आहळला जीव माझा । २ ।
आनंदाचें जीवन पाहेन श्रीमुख । शोक मोह दुःख हरती माझे । ३ ।
विटेसहित चरण देईन आलिंगनु । तेणें माझी तनु ओल्हावेल । ४ ।
तुम्ही आवडते हरीचें अंतरंग । माझे जिवलग प्राणसखे । ५ ।
नामा म्हणे विठोबा कृपेची माउली । तळहाते साउली करील मज । ६ ।

२०६९. भोळ्या भाविकांचें वचन नुलंघी । फिरतसे संगें तया मागें । १ ।
मी एक अभक्त मी एक अभक्त । मी एक अभक्त पापराशी । २ ।
नाममाळा दृढ न करीं जतन । परि जाणे वर्मखूण संतसंगें । ३ ।
नामा म्हणे नाहीं तुम्हांसी उपमा । आमुचे स्वधर्म शुद्ध नाहीं । ४ ।

२०७०. परिसाचेनि संगें लोह होय सुवर्ण । तैसा भेटे नारायण संतसंगें । १ ।
कीटकी ध्यातां भृंगी झाला तोचि वर्ण । तैसा भेटे नारायण संतसंगें । २ ।
वनस्पति परिमळु चंदन झाला जाण । तैसा भेटे नारायण संतसंगें । ३ ।
अग्नीस मिळे तें नये परतोन । तैसा भेटे नारायण संतसंगें । ४ ।
सरिता ओघ जाय सिंधूसि मिळून । तैसा भेटे नारायण संतसंगें । ५ ।
नामा म्हणे केशवा मज देईं संतसंग । आणिक कांहीं तुज न मागें बापा । ६ ।

२०७१. येतां जातां थोर कष्टलो गर्भवासीं । पडिलों गा उपवासी प्रेमेंविण । १ ।
बहुतांचा सेवकु झालो काकुळती । न पावे विश्रांति कधीं काळीं । २ ।

ऐसें माझें मन शिणलें नानापरी। घालीन आभारी संतांचिया। ३ ।
वियोगें संताच्या व्याकुळ चिंतातुर। हिंडे दारोदार दीन रूपें। ४ ।
परि कोणी संतांच्या न घालिती चरणीं। तळमळी अनुदिनी श्रांत सदा। ५ ।
माझें माझें म्हणवूनि जया घाली मिठी। दिसे तेंचि दिठी नाहीं होय। ६ ।
तया शोकानळें संतप्त आंदोळे। गेले तें न मिळे कदा काळीं। ७ ।
न देखत ठायीं देखावया धांवें। भ्रांति भुले भावें नानामार्गीं। ८ ।
तुझा स्वरूपानंदु नाहीं ओळखिला। जाहली विठ्ठला हानि थोर। ९ ।
लोहाचा कवळु लागल्या परिसातें। पढिये सर्वांते होय जेंवि। १०।
नामा म्हणे तैसी भेटी संतचरणीं। करूनि त्रिभुवनीं होईन सरता। ११।

२०७२. सुख सांगावें संतांपुढें। जेणें सुख अधिक वाढे। १ ।
आणिका न करावें शाहणे। प्रेम दिठावेल झणें। २ ।
खंडिला कल्पनेचा लाग। त्यासि असावा अनुराग। ३ ।
तोडिला वासनेचा तंतु। त्यासि असावा एकांतु। ४ ।
गिळिलें अहंतेचें बीज। त्याचे व्हावें चरणरज। ५ ।
नामा म्हणे त्या संगतीं। चित्ता आपेंआप निवृत्ति। ६ ।

२०७३. भस्म तो होतसे आला जो आकारा। नासे प्रपंच सारा नाममंत्र। १ ।
झाला अनुभव प्रपंचींच ब्रह्म। मना झाला निश्चय संतकृपे। २ ।
म्हणोनियां संतां जावोनि शरण। साधुनि निजधन नामब्रह्म। ३ ।
नामदेव म्हणे संतांचेनि कृपें। हृदयीं नाम सोपें नांदतसे। ४ ।

२०७४. संतांच्या चरणा द्यावें अलिंगन। जीवें निंबलोण उतरावें। १ ।
तेथें तूं निश्चळ राहें माझ्या मना। मग तुज यातना नव्हती कांहीं। २ ।
संतांचे द्वारींचे होईं द्वारपाळ। तुटे मायाजाळ मोहपाश। ३ ।
संतांचे प्रसाद सेविसीं उरले। आयुष्य सरलें दुणावेल। ४ ।
नामा म्हणे संत आहेत कृपासिंधु। देती भक्तिबोधु प्रेमसुख। ५ ।

२०७५. मंत्रयंत्र दीक्षा सांगतील लक्ष। परि राम प्रत्यक्ष न करी कोण्ही। १ ।
प्रत्यक्ष दावील राम धरीन त्याचे पाय। आणिकांची काय चाड मज। २ ।
सर्व कामीं राम भेटविती मातें। जीवेंभावें त्यातें ओंवाळीन। ३ ।
नामा म्हणे आम्हां थोर लाभ झाला। सोइरा भेटला अंतरींचा। ४ ।

२०७६. आपुलें शरीर घालूनियां पुढें। पडे वार्डेकोर्डे सर्वभावें। १ ।
नाम आवडती नानाभूत सृष्टी। देखेन मी दृष्टीं ब्रह्मरूप। २ ।
विष्णुरूप सर्व भावी अखंडित। मानी सर्वभूत आत्मा माझा। ३ ।
नामा म्हणे सत्य सत्य जे बोलती । त्यांचे पायींची माती इच्छितसें। ४ ।

२०७७. संतांचें लक्षण ओळखाया खूण । जो दिसे उदासीन देहभावा। १ ।
सतत अंतरीं प्रेमाचा जिव्हाळा। वाचे वसे चाळा रामकृष्ण। २ ।
त्या संताचे चरण देखिले मीं दृष्टीं। जळती कल्पकोटी पापराशी। ३ ।
जयाच्या हृदयीं प्रेमाचा जिव्हाळा। जीवेंभावें गोपाळा न विसंबती। ४ ।
त्याचे आंगणींचा होईन सांडोवा। मग तूं केशवा नुपेक्षिसी। ५ ।
तुझ्या ध्यानीं ज्याचें सदा भरलें मन। विश्व तूंचि म्हणोन भजती भावें। ६ ।
त्याच्या उष्टावळीचा होईन मागता। तरीच पंढरीनाथा भेटी देसी। ७ ।
ऐसे नित्यानंदें बोधें जे निवाले। ते जिवावेगळे न करीं नामा। ८ ।

२०७८. माझे मायबाप साधुसंतजन। माझे जीवप्राण अंतरींचे। १ ।
भवभयाहुनि तारियेलें मज । बाळेंभोळें गुज प्रेम दावी। २ ।
रंकाहुनि रंक झालों मी सेवक। ब्रह्मादिक देख इच्छिती सुख। ३ ।
नामा म्हणे संतभाग्य अलौकिक। शुद्ध निष्कलंक पुण्यरूप। ४ ।

२०७९. पंढरीचें प्रेम आहे ज्यांचे जीवीं। त्यांची नित्य नवी करीन आशा। १ ।
ते माझे सोइरे सुखाचे सद्‌गुरू। भवसिंधुचा पारू उतरती । २ ।
माझ्या विठोबाच्या नामीं ज्यां विश्वास। होइन त्यांचा दास आवडीचा। ३ ।

माझ्या विठोबाच्या चरणीं ज्यांचा भाव। दारवंटा पाय धरीन त्यांचे । ४ ।
माझ्या विठोबाचें ध्यान ज्यांचे मनीं । सांडोवा अंगणीं होईन त्यांचे। ५ ।
ऐसे सर्वभावें माझ्या विठोबा शरण। त्यांचे वंदीन चरण नामा म्हणे। ६ ।

२०८०. पंढरीचें सुख जिहीं अनुभविलें। भावें अनुसरले विठ्ठलपायीं। १ ।
काया वाचा मन रंगलें चरणीं । धरियेला मनीं पांडुरंग। २ ।
नामाचेनि बळें उडविलीं साधनें। तोडिलीं बंधनें संसाराचीं । ३ ।
योगियांचें घर रिघे काकुलती। आव्हेरीलें संतीं म्हणोनियां। ४ ।
दोन्ही कर जोडुनि मोक्ष पाहे वास । म्हणे होईन दास हरिदासाचा। ५ ।
तंव तुच्छ करोनि न पाहती दृष्टी। आपंगिलें शेवटीं ब्रह्मज्ञानें । ६ ।
अष्ट महासिद्धि म्हणती कवण गति। यावें काकुलती कवणा आम्ही। ७ ।
मोक्ष मुक्ति जिहीं हाणितल्या पायीं । आमुची ते सोयी काय धरिती। ८ ।
ऐसे भक्तराज देवां वंद्य झाले । ते एक राज्य केलें पुंडलिकें। ९ ।
हर्षे निर्भर नामा नाचे महाद्वारीं। मुखी निरंतरी नामघोष ।१०।

२०८१. नामामृत सरिता पवित्र हरिकथा। त्रिभुवनींच्या तीर्थां मुगुटमणि। १ ।
तेथें माझ्या मना होईं क्षेत्रवासी। राहें संतांपाशीं सुख घेतां। २ ।
ऐहिक्य परत्र दोन्हीं समतीरीं । परमानंदलहरी झेंपावत। ३ ।
मुक्तांचें जीवन मुमुक्षा माउली। शिणल्या साउली विषयासक्तां। ४ ।
परमहंसकुळ सनकादिक सकळ। राहिले निश्चळ करोनि चित्त। ५ ।
नामा म्हणे मना सोइरे हरिजन। तारक त्यांचे चरण दृढ धरीं। ६ ।

२०८२. तुझिया संतांची अंगसंगसंगति । पावलिया विश्रांति संसारिया। १ ।
श्रवण कीर्तन ध्यान घडे अनायासें । भेदभ्रम नासे तेचि क्षणीं। २ ।
ऐसें भाग्य मज देसी कवणे काळीं। होईन पायधुळी वैष्णवांची। ३ ।
वदनीं तुझें नाम वसे निरंतर। राखीन त्याचें द्वार थोर आशा। ४ ।
येतां जातां मज करिती सावधान। वदनीं कृष्ण कृष्ण म्हणविती। ५ ।

कामधेनु घरीं असे प्रसवली। ते विकावया नेली दैवहतें। ६।
पंथीं पडिला पायां लागे चिंतामणि। पाषाण म्हणऊनि उपेक्षिला। ७।
तैशी परी मज जाहली अधमा। चुकलों तुझ्या वर्मा केशिराजा। ८।
नामा म्हणे थोर खंती वाटे चित्ता। कृपा करूनि माथा ठेवी चरणीं। ९।

२०८३. जैसा वृक्ष नेणे मान अपमान। तैसे ते सज्जन वर्तताती। १।
येऊनियां पूजा प्राणि जे करिती। त्याचें सुख चित्तीं तया नाहीं। २।
अथवा कोणी प्राणि येऊनि तोडिती। तया न म्हणती छेदूं नका। ३।
निंदास्तुति सम मानिती जे संत। पूर्ण धैर्यवंत साधु ऐसे। ४।
नामा म्हणे त्यांची जरी होय भेटी। तरी जीव शिवा गांठी पडूनि जाय। ५।

२०८४. अवघे ते संसारीं जाणावे ते धन्य। ज्यांचें प्रेम पूर्ण पांडुरंगीं। १।
अवघे ते दैवाचे विठ्ठल म्हणती वाचे। अवघे कुळ त्याचें पुण्यरूप। २।
अवघ्यारूपीं एक विठ्ठल भाविती। अवघ्या मनें भजती अवघेपणें। ३।
अवघे मिथ्या जाणोनि अवधिया विठ्ठलें। अवघे विनटले विठ्ठलपायीं। ४।
अवघे पूर्ण बोधें भावें प्रेमें प्रीती। ध्यानीं गीतीं गाती केशिराज। ५।
अवघा हा विठ्ठलु भोगी दिनराती। वोळंगें किंकरवृत्ति नामा त्यासी। ६।

२०८५. संत-चरण-रज सेवितां सहज। वासनेचें बीज जळुनी जाय। १।
मग रामनामीं उपजे आवडी। सुख घडोघडी वाढों लागे। २।
भेदभ्रम आटे आशापाश तुटे। विश्रांति हे भेटे संतसंगे। ३।
प्रेमें कंठ दाटे आनंदें पूर लोटे। हृदयीं प्रगटे रामरूप। ४।
नामा म्हणे सोपें साधन गोमटें। साधे त्या उत्कृष्ट पूर्वपुण्यें। ५।

२०८६. धन्य तोचि जगीं जाणा राजयोगी। जेणे पांडुरंगीं धरिला भाव। १।
संकल्प विकल्प शून्य करूनि मन। हृदयी धरिले ध्यान विठोबाचे। २।
महापापराशी त्याचा झाली होळी। वाजविता टाळी विठ्ठल नामे। ३।

कोटी कुळे त्याची क्षणेचि पावन। करिता एक स्नान चंद्रभागे। ४ ।
नामा म्हणे धन्य धन्य ते संसारी। चालविती वारी पंढरीची । ५ ।

२०८७. ज्याचियारे मनें देखियेलें तुज । त्याची लोकलाज मावळली। १ ।
नाहीं तया क्रिया नाहीं तया कर्म। वर्णाश्रमधर्म सुख दुःख । २ ।
नाहीं देहस्फूर्ति जाती कूळ भेद । अखंड आनंद ऐक्यतेचा । ३ ।
नामा म्हणे त्याचे चरणरज व्हावें । हेंचि भावे द्यावें केशिराजा। ४ ।

२०८८. संतापायीं माथा धरितां सद्‌भाव । तेणें भेटे देव आपेंआप। १ ।
म्हणवूनि संतांसी अखंड भजावें। त्यांचे पायी व्हावे लीन सदा। २ ।
संताघरी देव कामधंदा करी। पीतांबर धरी वरी छाया । ३ ।
नामा म्हणे देव इच्छी संतसंग । आम्हा जीवलग जन्मोजन्मीं। ४ ।

२०८९. आकल्प आयुष्य व्हावें तयां कुळां । माझिया सकळां हरिच्या दासां। १ ।
कल्पनेची बाधा न हो कोणे काळीं । हि संत मंडळी सुखी असो । २ ।
अहंकाराचा वारा न लागो राजसां । माझ्या विष्णुदासां भाविकांसी। ३ ।
नामा म्हणे तया असावें कल्याण। ज्या मुखीं निधान पांडुरंग । ४ ।

भक्त पुंडलिक कार्याचे महिमान माघ शुद्ध एकादशीस, श्री पुंडलिकरायांचा उत्सव श्री क्षेत्र पंढरी येथे श्री पुंडलिकरायांचे मंदिराजवळ संपन्न होतो

२०९०. प्रल्हादा रक्षिलें पांडवां प्रतिपाळिलें। तया उभें केलें पुंडलिकें । १ ।
बिभिषणा स्थापिलें ध्रुवा अढळ केलें । तया उभें केलें पुंडलिकें । २ ।
चैद्यादि मर्दिले सुरवर तारीले । तया उभें केलें पुंडलीकें । ३ ।
अहिल्ये उद्धरिलें गजेंद्रा उद्धरिलें । तया उभें केलें पुंडलीकें । ४ ।
गयासुरा वधिलें बळिस पाताळीं घातलें। तया उभें केलें पुंडलीकें । ५ ।
नामा म्हणे केशवा भक्तांचें ठेवणें। घेऊनि कैंवि जाणें घडे तुज। ६ ।

२०९१. भक्त पुंडलिका देखोनि निकटा । आलासी वैकुंठाहुनि आजी । १ ।
नारद वचन ऐकोनियां मनीं । सुखें चक्रपाणि सुखावला। २ ।

सुखरूप सदा देव दुरी ठेला । मुनीश्वर काला स्वयें दावी । ३ ।
नामा म्हणे तुज भक्ति पिसें फार । साधिलें नगर क्षणमात्रें । ४ ।

२०९२. पितयाची भक्ति पुंडलिकें केली । मात हे ऐकिली देवरायें। १ ।
नवलक्ष गोधनें पांचसें सवंगडे । रामकृष्ण पुढें चालताती। २ ।
उठा चला जावों पुंडलीक पाहों । देव म्हणे भावो पाहों त्याचा। ३ ।
गोकुळींहुनि देव पंढरपुरा पातला । त्वरित पावला वेणुनादीं। ४ ।
तेथुनि परतला वाळुवंटीं आला । तंव देव देखिला पुंडलीकें। ५ ।
देव उभा आहे पुंडलीक पाहे । चतुर्भूज स्वयें देखियेला। ६ ।
देखियेले हरि शंख चक्र करीं। आयुधें तीं चारी झळकती। ७ ।
चतुर्भूज मूर्ति देखियेली दृष्टी। पुंडलिकें वीट टाकियेली। ८ ।
वीटेवरी उभा राहिला विठ्ठल । ठसा मिरवला त्रिभुवनीं। ९ ।
पुंडलिक भाव पाहुं आला देव। प्रसन्न झाले सर्व पुंडलीका।१०।
वैकुंठ कैलास आणिल हा येथ। नामा म्हणे हित झालें आम्हां।११।

२०९३. पुंडलीकालागुनी म्हणे पांडुरंग। सखा जीवलग तूंची माझा। १ ।
न पाहासी वास बोलसी उदास। सांडोनियां आस सर्वस्वाची। २ ।
वैकुंठ सोडोनी आलों तुजपाशीं। कां गा न बोलसी भक्तराया। ३ ।
पितृभजनाचा झालासी अधिकारी। केली बा पायरी वैकुंठासी। ४ ।
माग बापा कांहीं आवडे तें घेईं। मज वाटे हृदयीं घालावासी। ५ ।
नामा म्हणे देव स्वामी मुगुटमणी। उभा कर ठेवुनी कटीवरी। ६ ।

२०९४. एक वेळ भेटी आलो भक्तराया। स्फुरति माझ्या बाह्या क्षेमालागीं। १ ।
ऊठ पुंडलिका परतोनियां पाहें। जीवींचें आर्त काय सांग मज। २ ।
जीवाचीं पारणीं फेडीं डोळियांची। वास श्रीमुखाची पाहूं देईं। ३ ।
हेंची आर्त धरोनि आलों असें जीवीं। तें तूं सर्व पुरवीं भक्तराया। ४ ।
नामयाचा स्वामी कृपेचा कोंवळा। म्हणऊनि उतावळा भक्तालागीं। ५ ।

२०९५. सांडुनी वैकुंठ न धरत पातलों। तुज भेटावया आलों पुंडलिका। १ ।
प्रीतीचा वोरसु हृदयीं दाटला। नुठिसी कां वहिला आलिंगना। २ ।
भक्त शिरोमणी आमुचा जीवलग। म्हणे पांडुरंग पुंडलिका। ३ ।
स्फुरती भुजादंड आणि वक्षस्थळ। हरूषें नयनकमळ विकासलें। ४ ।
आनंदें रोमांच उद्भवले आंगीं। क्षेम देई वेगीं भक्तराया। ५ ।
मज नामरूप तुमचेनी संभ्रमें। केलीं जन्म कर्मे असंख्यात। ६ ।
तुमचिया आवडी असे म्यां विकिला। सांग कोण्या बोला रुसलासी। ७ ।
हृदयींचें निजगुज सांग रे सकळीक। तेणें मज सुख होईल जीवा। ८ ।
परतोनियां दृष्टि पाहें आळुमाळ। तेणें हरेल सकळ श्रम माझा। ९ ।
ऐसा भक्तजनवत्सलु भक्तांचा विसावा। भक्तांचिया भावा भाळलासे। १०।
कटावरी दोनी हात उभा पुंडलिका द्वारीं। नामया स्वामी हरि विनवीतसे। ११।

२०९६. माझिया पितयाचा होईल निद्राभंग। न घडे प्रसंग बोलायाचा। १ ।
क्षण एक मौन धरूनियां रहा। शरणागत पहा कृपादृष्टी। २ ।
करूनि निर्धार आलेती जेणें भावें। जतन करावें वचन देवा। ३ ।
नच जावें देवा माझे गांवेहुनी। मागतों प्रार्थुनी हेंचि तुम्हां। ४ ।
माझें सुख पहावें मागेन तें द्यावें। माझे गांवीं व्हावें अधिपती। ५ ।
नामयाचा स्वामी भक्तीसी भुलला। पुंडलीकें राहविला पंढरीये। ६ ।

२०९७. आलासी आरते धरिलासी चित्तें। आतां तुज मागुतें जावों नेदीं। १ ।
शरीर प्राणाचा देईन मी बळी। तुज हृदयकमळीं सांठवीन। २ ।
धरिलासी तूं एक वैकुंठनायक। म्हणे पुंडलीक पांडुरंगा। ३ ।
इहलोकींचें सुख न मगों सकळीक। आणिक परलोक चाड नाहीं। ४ ।
पंढरीस राही रखुमाई समवेत। तेणें मनोरथ पूर्ण होती। ५ ।
तुझें रूप दृष्टी नामस्मरण पुटीं। मना चरणीं मिठी पडोनि गेली। ६ ।
तुझे चरणीं आर्त हृदयीं नामामृत। तेणें मी समर्थ मिरवें जगीं। ७ ।

संतां सोयरियांची व्हावयासि भेटी। म्हणोनि वाळवंटीं वस्ती केली। ८ ।
परब्रह्म पुतळा देखिलासि डोळां। समाधि सुख सोहळा पांडुरंगा। ९ ।
कटीं ठेवूनि हात आपण पंढरीनाथ। भक्तांचा एकांत श्रवण करी। १० ।
उभारे म्हणोनि दिधलें आपणातें। संबोखून नामयातें प्रेम दिलें। ११ ।

२०९८. तंव पुंडलिक पुढारला। कर जोडोनियां वदला।
म्हणे वेदादिकां अबोला। तुझिया स्वरूपाचा। १ ।
तो तूं प्रगटलासी श्रीरंगा। येऊनि आमुच्या लोभा।
स्थीर राहुनि चंद्रभागा। भक्तजनां तारीसी। २ ।
नेणों कोण भक्तपण। नेणों तुमचें महीमान।
कोणे जन्मीं साधन। कोण केलें हें नेणवे। ३ ।
नीरे भीवरे संगमीं। चंद्रभागेचे उगमीं।
वेणुनाद परब्रह्मीं। गोपाळ गजरें गर्जती। ४ ।
तरी स्वामी दीनदयाळा। महाविष्णु गा गोपाळा।
भक्तालागीं कृपाळा। तारावया तयासी। ५ ।
माझें करोनियां मीस। वास केला युगें अठ्ठावीस।
धरूनि सगुण गुणास। माझे भक्ति लाधलासी। ६ ।
तूं नियंता ईश्वरमूर्ती। सकळा गोसांवी श्रीपती।
तुजवांचूनि नेणों मती। दयामूर्ति परब्रह्मा। ७ ।
नामा म्हणे पुंडलिकें। ऐसें स्तवन केले निकें।
तंव म्हणितलें पुण्य श्लोकें। पुरे पुरे करीं आतां। ८ ।

२०९९. कर्मजड मूढ पतीत पामर। भवसिंधु पार नटके जया। १ ।
यालागीं पंढरी केली मुक्ति पेंठ। भक्तें भूवैकुंठ वसविलें। २ ।
हेंचि पुंडलिकें मागितलें निकें। जें सर्वथा परलोकें चाड नाहीं। ३ ।
भक्ति मुक्ति सिद्धि जें जया आवडे। तें तया पवाडे विठ्ठलनामें। ४ ।

न लगती सायास करणें कायाक्लेश। नामाचा विश्वास दृढ धरा। ५ ।
नामा म्हणे अवघे चला पंढरीये। भेटों बापमाय पांडुरंगा। ६ ।

## ❁ भगवंतांनी पुंडलीकरायांना दिलेले वरदान ❁

२१००. म्हणे पुंडलीक देवा शिरोमणी । परिसावी विनवणी एक माझी। १ ।
संसारबंधने तोडावी दरूषणे। हें एक मागणें तुजप्रति। २ ।
पंच महापातकी विश्वासघातकी। ज्यासी यमादिकीं गांजियलें। ३ ।
ऐसिया पतीता करावे सनाथ। पुरवीं माझें आर्त पांडुरंगा। ४ ।
हेंचि माझें काज अंतरींचें गुज। उद्धरीं सहज महादोषी। ५ ।
नामा म्हणे वर दिला नारायणें। विठ्ठलदर्शनें मोक्ष जीवा। ६ ।

## ❁ श्री पंढरी माहात्म्य, सर्वोत्तम तीर्थ, क्षेत्र आणि देव महिमान व दर्शन ❁

२१०१. वेदां अगोचर परब्रह्म कारण। योगिया हृदयींचें परमतत्व निर्वाण।
आकळूं न कळे श्रुति धरियेलें मौन। तें रूप पंढरीये विटे समचरण। १ ।
कानडा विठ्ठलु। उभा भिवरेतीरीं।
भेटीचे आर्तवो जीवा लागलें भारी। ध्रु०।
भूवैकुंठ पंढरी देवें रचियेली पैं गा। शिवें ती वंदिली चरणीची गंगा।
सदाचार नामघोष कलिमल जाय भंगा। काय सुख वानूं तेथिंचें भेटी पांडुरंगा। २ ।
विठ्ठल नाम वाचे जना हाचि उपचारू। म्हणोनि दावितसे कटीं ठेवुनियां करू।
येरासी मायानदी काम क्रोध मगरू। ठेवा नामयाचा स्वामी विठ्ठल वीरू। ३ ।

२१०२. निर्गुण गुणासी आलें। परब्रह्म ठसावलें।
भक्त पुंडलिका लाधलें। गौप्य केलें प्रगट। १ ।
सेवा सेवा ब्रह्मरस। विठ्ठल पंढरीनिवास। ध्रु०।
निर्गुण गुणाकार। मूर्ति सांवळी सुंदर।
सकल गुणाचें माहेर। मुक्ति पेंठ पंढरी। २ ।

धन्य धन्य भीमातट। चंद्रभागा हे निकट।
जेथें विठ्ठल वीर प्रगट। नाम गर्जती हरिदास। ३ ।
धन्य धन्य पद्माळें। सभरा भरित आनंद जळें।
स्नान केलिया निर्मळ। कोटी कुळें उद्धरती। ४ ।
धन्य धन्य मान देश। विठ्ठलें केला रहिवास।
नामा म्हणे विष्णुदास। देईं उल्हास भक्तीचा। ५ ।

२१०३. संपूर्ण विश्वाचा आत्म्याचा जो आत्मा। तोचि हा परमात्मा विटेवरी। १ ।
द्वादश लिंगांचें जें कां आत्मलिंग। ते हे पांडुरंग विटेवरी। २ ।
अनंत सूर्यांची ज्योतीची नीजज्योती। तीही उभी मूर्ती विटेवरी। ३ ।
अनंत शक्तींची जी निजशक्ती। तीही उभी मूर्ती विटेवरी। ४ ।
अनंत ब्रह्मांचें जें कां निजब्रह्म। तें हें परब्रह्म विटेवरी। ५ ।
अनंत चैतन्यांचें जे कां निज चैतन्य। तें हें समध्यान विटेवरी। ६ ।
अनंत विराटाचें स्वरूपाचें निजरूप। तें हें चिद्स्वरूप विटेवरी। ७ ।
अनंत वेदांचा अर्थाचा निज अर्थ। तोचि महा सिद्धांत विटेवरी। ८ ।
अनंत शास्त्रांचें पुराणांचें सार। त्याचेही जिव्हार विटेवरी। ९ ।
अनंत सिद्धींची जी कां निज सिद्धी। ते हे महासिद्धि विटेवरी। १०।
चहूंवाचेची जी निज वाचा। ते हे अनिर्वाच्य विटेवरी। ११।
भक्तीची निज भक्ति मुक्तीची निज मुक्ति। शांतीची निज शांती विटेवरी। १२।
शोधाचा महाशोध बोधाचा महा बोध। शुद्धाचाही शुद्ध विटेवरी। १३।
काळाचा महाकाळ वेळेची महावेळ। फळाचें महाफळ विटेवरी। १४।
अनंत पिंडाचें ब्रह्मांड सहीत। सांठवण सत्य विटेवरी। १५।
अनंत सत्त्वाचें जें कां निज सत्त्व। तत्वाचें निज तत्व विटेवरी। १६।
सर्व संबंधाचा जो का निज संबंध। आनंदाचा कंद विटेवरी। १७।
नामा म्हणे सर्व सुखाचा आराम। धामा परमधाम विटेवरी। १८।

२१०४. निर्विकल्प निराकारू। नि:शुन्य निराधारू।
निर्गुण अपरंपारू। चिदानंद सांवळें। १ ।
तया पुंडलिकासाठीं। येऊनि उभें वाळवंटीं।
दोन्ही कर ठेवुनि कटीं। प्रसन्न दृष्टि पाहातसे। २ ।
म्हणऊनि उठा घ्यारे वाट। ठाका पंढरी वैकुंठ।
येर वावगे काय कष्ट। ब्रह्मी भेट पंढरीये। ३ ।
मूळग्राम मायापुर। पडिले भूत ग्रामाचार।
म्हणऊनि कर जघनावर। उभा राहुनि दावितसे। ४ ।
विठ्ठल नाम हृदयीं धरा। हाचि उतार पैलपारा।
मग नाहीं येरझारा। शंभु कुमार सांगतसे। ५ ।
भेटी चौघे मुरडले। अठरा धांवतां भागले।
पंथीं साहि भांडले। ते अद्यापि बुझले नाहीं। ६ ।
जो सहस्रा माजी न दिसे। चोविसांत न भासे।
दो सहस्र अनारिसे। पाहतां अरे न दिसेचि। ७ ।
लयलक्ष लावुनि समाधि। योगियां हेचि उपाधि।
उघडा डोळा प्रेमपदीं। रे विठोजी न्याहाळा। ८ ।
येर वाउगि खटपट। ठाका पंढरी वाळुवंट।
हरूनि मनुष्यपण दृष्ट। चतुर्भुज करिल। ९ ।
जना ऐहिक पाहा रे हित। हें पंढरीचें कुळदैवत।
येर वाउगे खेचर भूत। रे संगीत चित्रिंचें। १०।
पूर्वज उद्धरावयाचि चाडु। तरी वेणुनादीं जेवण करा गोडु।
कोटिकुळें उद्धरती सुरवाडु। रे पावाल कैवल्य। ११।
धन्य धन्य तो संसारीं। जेणें देखिली पंढरी।
जेणें सप्रेम होऊनि महाद्वारीं। लोटांगण घातलें। १२।

केलें चंद्रभागे स्नान। आणि संतचरणीं दर्शन।
नामघोषें निवें मन। समाधान जीवासी।१३।
पंढरी हे वैकुंठ भुवन। म्हणऊनि करीं कारे दरुषन।
मग नाहीं आया गमन। रे सुरगण वंदिती।१४।
भुक्ति मुक्तिचा दातारू। तो हा वोळगा सारंगधरू।
नामया स्वामीचा दातारू। रुक्मादेवीवरू पंढरीये।१५।

२१०५. अनिर्वाच्य ब्रह्म निगम म्हणती। शिणले वेवादती अठरा साही। १।
तें हें पुंडलिकें चोहोंटा उभें केलें। भावें भुलविलें पंढरीये। २।
घ्यारे घ्यारे तुम्ही कैवल्याचें पीक। देतो पुंडलीक सकळ जीवां। ३।
उपनिषदांचें मथितार्थ जें साराचें यथार्थ। तो हा पंढरीनाथ प्रगट जगीं। ४।
हरिहर विरंचि त्रिमूर्ति हाची। माउली दीनांची लोभा पर। ५।
जो श्रवणांचा श्रवण नयनांचा नयन। ज्ञानाचा दर्पण दृष्ट होय। ६।
आदि मध्ये अंती व्यापक सर्वांभूतीं। तो हा झाला व्यक्ति भक्तिभावें। ७।
सच्चिदानंद आनंदघन परिपूर्ण। कारणें महाकारण प्रभा हेचि। ८।
चित्ता चेतविता बुद्धीतें पाळिता। मनादि चाळिता इंद्रियांसी। ९।
तो या चराचरीं जीवलग सोइरा। म्हणोनि अनुसरा पांडुरंगा।१०।
नामा म्हणे काया वाचा मनें त्याचें। नाम जपा कैचें जन्ममरण।११।

२१०६. अहो त्रिभुवना माझारीं। भूवैंकुंठ पंढरी।
चंद्रभागा सरोवरीं। विटेवरी नीट उभा। १।
उभा कैवल्य नायक। दृष्टी सन्मुख पुंडलीक।
ज्याचे ब्रह्मादिक सेवक। इतरां कोण पाड। २।
सुरंग रंगें चरणतळें। रातलीं रातोत्पळें।
जिंकिलीं माणिक निळें। मज पाहतां बाई। ३।
पद अंकुश पताका। ध्वज वज्रांकित रेखा।
तेथें लक्ष्मी रतली देखा। सिंधुतनया बाई। ४।

अनुपम्य गे माय अनुपम्य सार। परब्रह्म वो साकार।
मंत्रमय त्रिअक्षर। विठ्ठलनाम बाई। ५।
तें गा प्रत्यक्ष ध्यान। सर्व सुखाचें निधान।
दृष्टीं पाहतांचि मन। माझें परतेना। ६।
न लागे पातयासी पातें। लक्ष लागलें निरूतें।
सुख झालें बा मनातें। तें मी काय सांगों वो माय। ७।
मन इंद्रियें वेधलीं। घर वृत्तिचें रिघालीं।
काय स्वानंदा मुकलीं। वेगळेपणें। ८।
पदद्वयाची ठेवणी। इंद्रनीळ गुल्फमणी।
गंगा मिरवत चरणीं। वांकी तोडर पायीं। ९।
सरळ अंगोळियावरी। नखें वर्तुळ साजिरीं।
चंद्र देखोनि अंबरी। झाला कळाहीन। १०।
पोटरीया जानु जंघ। मर्गजमणीचे स्तंभ।
कैसें वोळलें स्वयंभ। ओघ जैसे कलिंदीचे। ११।
पितांबर माळ गांठीं। रत्नकिळा बरवंटीं।
विद्युल्लतेच्या थाटीं। जैशा मेघमंडळीं। १२।
वीरकंकणें मनगटीं। कांडोवांडीं मुद्रिका दाटी।
माज सामावे जो मुठीं। वरी कटी कटिसूत्र। १३।
नाभीं सरोज गहन। ब्रह्मयाचें जन्मस्थान।
वरी त्रिवळी लक्षण। कैसें शोभे रोमराजीं। १४।
काय वाणूं तें उदर। सांठवलें चराचर।
ब्रह्मगोळ निरंतर। जया रोमरंध्रीं। १५।
तनु मृदु शाम निर्मळ। प्रभा दिसती सोज्वळ।
जेवीं ओळलेंसे जळ। जैसें घनमंडळीं। १६।
शुद्ध चंदन पातळ। अंगीं चर्चिला निर्मळ।
जेवीं इंद्रनीळ किळ। गुल्फ मोतियांचे। १७।

पदक बाहुभूषणें । नवरत्नांचें खेवणें ।
कैसें सर्वां झालें पेणें । लेणें लेणियासी । १८ ।
कौस्तुभ मिरवे कंठीं । माजी रत्नांचिये दाटी ।
तेथें सुरवरांच्या दृष्टी। भाळलिया । १९ ।
श्रवणीं कुंडलें झळकती । जैशा विजुवा तळपती ।
कंठीं माळ वैजयंती । सह तुळसी दळेसी। २० ।
विशाल नयन दृष्टी । ठेऊनियां नासापुटीं ।
दावी योग कसवटी। योगीयांसी गे माये । २१ ।
लिंग स्वयंभू शीर स्थळीं। रश्मी मुगुट झळाळी ।
वेटी मोरपिसातळीं। मृग नाभी तिळक । २२ ।
स्मित अधर सुरेख । कैसे निमासूर मुख ।
तेथें मदन पर्यंक। कोटी कुरवंड्या। २३ ।
विष्णुदास नामा जिवें । ओंवाळी सर्व भावें।
अनुभव अनुभवें। अनुभविजें सदा । २४ ।

२१०७. काशी हे पंढरी। प्रयाग नीरा नृसिंहपुरी।
पिंड ठेवा पुष्पावती संगमपदावरी। पूर्वज होती चतुर्भुज । १ ।
सकळ तीर्थासह वाराणसी । मध्यानकाळीं येती पंढरीसी ।
ओंवाळिती विठोबासी । विश्वनाथ म्हणोनियां । २ ।
म्हणऊनि वेगीं चला पंढरपुरा। विठोबारायाच्या नगरा।
चंद्रभागा सरोवरा। देव कौतुक पाहती । ३ ।
वाराणसी मनिकर्णिका । चंद्रभागा पुंडलिका ।
वाराणसी भागीरथी देखा। पांडुरंगीं भीमरथी। ४ ।
वाराणसी पंचगंगा । पुष्पावती पांडुरंगा ।
महा पातकें जाती भंगा। तीर्थें मस्तकीं वंदिल्या । ५ ।

वाराणसी दंडपाणि। क्षेत्रपाळ हे हनुमंत दोन्ही।
सकळ तीर्थें विठोबाचे चरणीं । काशी होय पंढरी । ६ ।
वाराणसी माधवबिंदू । पांडुरंगीं वेणुनादु।
पंचक्रोशी तीर्थ उदंडू । पांडुरंगीं पद्मतीर्थ । ७ ।
वाराणसी मोक्षपंथा । विठ्ठलाचेनि सायुज्यता ।
एवढें तीर्थ त्रिभुवनीं पाहतां । तीर्थ नाहीं यापरतें । ८ ।
वाराणसी चंद्रमौळी । पांडुरंगीं वनमाळी ।
विश्वनाथ नंदी जवळी । विठोबा गरूड । ९ ।
वाराणसी गौरी खुणा । पांडुरंगीं रूक्मिणी जाणा ।
वाराणसी अन्नपूर्णा । पांडुरंगीं जाणा सत्यभामा । १० ।
वाराणसी त्रिशुळावरी । सुदर्शनावरी पंढरी ।
कांहीं संदेह मनीं न धरीं । काशी होय पंढरी। ११ ।
ऐसें सकळ तीर्थांचें माहेर । तीर्थ नाहीं यापरतें थोर।
विष्णुदास नामयाचा दातार । पुंडलिकासहित असे । १२ ।

२१०८. सहस्रदळांत आकाशाच्या परी। राहोनी शरीरीं शोभा दावी। १ ।
तेंचि नटे थाटे उभा विटेवरी। कर कटावरी ठेऊनियां। २ ।
जयाचिये नाभीं जन्मला विधाता। तेथोनी वाढता लोक झाला। ३ ।
श्रुतीचिये वाचे नोहे गोचर । जेथें अवतार तिही देवा । ४ ।
नामा म्हणे विश्वंभरू आणिक। अंगुळ दशक आहे जें कां । ५ ।

२१०९. बरवेपणें बरवा बाप मदनाचा। तो स्वामी आमुचा पंढरीराव। १ ।
उदारपणें उदार दाता त्रैलोक्याचा। तो स्वामी आमुचा पंढरीराव। २ ।
झुंझार आणि शूर अरी त्या दैत्यांचा। तो स्वामी आमुचा पंढरीराव। ३ ।
चतुरपणें चतुर बाप ब्रह्मयाचा । तो स्वामी आमुचा पंढरीराव। ४ ।
पवित्रपणें पवित्र उद्धार तीर्थांचा। तो स्वामी आमुचा पंढरीराव। ५ ।
नामा म्हणे आधार सकळां जीवांचा। तो स्वामी आमुचा पंढरीराव। ६ ।

२११०. कार्तिकी एकादशी । पोहा मिळाला पंढरिसी।
तेथील महिमा वर्णूं कैसी । ब्रह्मादिकां न वर्णवे। १ ।
दिंड्या गरूडटक्यांचे भार। मृदंग वाजती अपार ।
वैष्णव नाचती जयजयकार । नादें अंबर गर्जतसे। २ ।
उपजोनियां संसारीं। वेळोवेळां पाहा रे पंढरी ।
विठ्ठलराज भीमातीरीं। वाट पाहे भक्तांची । ३ ।
कल्पतरू चिंतामणी। घरीं कामधेनूची दुभणी ।
मोतियांचे चौक राजांगणीं । वृंदावनें शोभती। ४ ।
संत बैसले पद्मासनीं । राया विठ्ठला तुझे चरण ध्यानीं।
हरिकिर्तन ऐकोनी कानीं । अंत:करणीं निवाले। ५ ।
जें जें चिंतन मानसीं । तें फळ पावलें अहर्निशीं ।
मुक्ति देऊनि तयासी। अढळपदीं बैसविलें। ६ ।
सकळ तीर्थें मध्यानकाळीं । येती चंद्रभागे जवळी।
विमानें येती अंतराळीं। देव स्नानें करिताती। ७ ।
धन्य धन्य चंद्रभागा तीर्थ । तेथें चतुर्भुज होती प्राणिमात्र।
ऐसें आणिक नाहीं क्षेत्र। भूवैकुंठ पंढरी। ८ ।
मणिकर्णी वैतरणी । स्नान करिजेती अंत:करणीं ।
लीन होईल विठ्ठल चरणीं। पायाधुणी होईल। ९ ।
अनंत जन्मांचा उपाव । नामया स्वामी पंढरीराव।
देईल वैकुंठीं ठाव। पुनर्जन्म चुकवील । १०।

२१११. अगाध भवजळ तरावया दुस्तर। रची पंढरपूर कलीमाजी। १ ।
तारू पंढरीनाथ मोलेंविण उतरी। उभा भिमातीरीं वाट पाहे। २ ।
बुडण्याचें भय नाहीं पैं संसारीं। कलीमाजी पंढरी थोर नाव। ३ ।
राव रंक दोन्ही बैसवोनी वरी। उतरी पैलतीरी भरंवसेनी। ४ ।
जया नावेवरी आठराही आवलें। साही खण भले मिरवती । ५ ।

चहूंमुखीं जिचा नकळेचि पार। पाहतां विचार सहस्रमुखा। ६ ।
सड्या लावी कांसे कुटुंबीं नावेवरी। उतरीलें तीरीं केशिराजें। ७ ।
प्रेमाचिया पेटी बांधोनियां पोटीं। उतरी जगजेठी पांडुरंग। ८ ।
अंगें घाली उडी बुडतिया काढी। ऐसे कल्प कोडी तारियेले। ९ ।
तारियेलें सत्य हाचि पैं निर्धार। नामा पैल पार उतरला। १०।

२११२. अगाध महिमा यात्रा कार्तिकिये। आला पंढरीये नामदेव। १ ।
भक्तां शिरोमणी श्रीपंढरीनाथा। कृपाळुवा माता बाळकासी। २ ।
धन्य नामदेव धन्य नामदेव। हृदयीं पंढरीराव न विसंबे। ३ ।
प्रेमळ हरीभक्त मिळोनी अपार। करिताती गजर हरिनामाचा। ४ ।
नटनाट्य कीर्तन झळकती गरूडटके। करिती ब्रह्मादिक पुष्पवृष्टी। ५ ।
नामघोष श्रवण सकळां समाधान। चुकलें जन्ममरण कल्पकोटी। ६ ।
नामा म्हणे जीव निवाला बा येथें। पहातां विठोबातें श्रम गेला। ७ ।

२११३. सहस्रअठ्यांशींऋषि। स्कंद उपदेशीं तयांसी।
तिहीं एक पुसिली पुसी। ते तयासी अकळ। १ ।
आतां जाऊं कैलासा। सकळ पुसूं त्या महेशा।
मग निघाले आकाशा। पितृदेशा पातले। २ ।
बरे होऊनियां सावध। ऐका भक्तीचा संवाद।
विनवीता झाला स्कंद। तो अनुवाद शंभूचा। ३ ।
स्कंदें विनविला त्रिपुरारी। सहित वामभागीं गौरी।
स्तुति स्तवनें केलीं भारी। हृदयासनीं नमियेला। ४ ।
मग निघाला लोटांगणीं। म्हणे त्राहें त्राहें शूळपाणि।
करें उचलिला धांवोनि। मग आसनीं बैसविला। ५ ।
ऋषींसि आसनें देऊनि वेगां। जवळीं बैसविलें पैं गा।
ते म्हणती झडकरी सांगा। जें वेदशास्त्रांसी प्रिय। ६ ।

तंव स्कंद म्हणे ताता। ऋषिनीं पुसिली जे वार्ता।
ते आकळ माझिया चित्ता । वेदशास्त्रार्थ विरहित। ७ ।
बरवीं तीर्थें पुण्यरासी। महात्म्यें सांगत होतों त्यांसी।
परी तीर्थ क्षेत्र भक्त देवांसी । नाहीं चहूंसी एक मेळा। ८ ।
जे जे क्षेत्रीं करितां विचार । ते ते ठायीं तेंचि थोर।
परि तयांमाजी असे सार। जें माहेर सकळिकां। ९ ।
पाप घडे जें मेदिनी । तयांसी तें तीर्थकर धुणी।
तीर्थां वर्णी शूळपाणि । सांगा हानि जें करी। १०।
जळती पातकांचिया कोडी । ऐसीं तीर्थें आहेत गाढी।
तयां सकळिकां तीर्थां आहे खोडी। ते मी उघडी सांगेन। ११।
हिमकाळीं कीजे स्नान । हेंचि प्रयागासी न्यून ।
काशी इच्छी जो मरण । थोर निर्वाण पाविजे। १२।
पितृस्मरण आचमन। करोनि देईजे पिंडदान।
तेणें पूर्वज होती पावन। हेंचि न्यून गयेसी। १३।
गाढें कुरूक्षेत्र जाण। तेथें किजे हिरण्यदान।
केदारीचें उदकपान। करी पीडन देहासी। १४।
उपमा द्वारकेहुनी। अरूच गोमतीचें पाणी।
सहा मास सेविल्यावांचुनी। नव्हे दाटणी चक्राशीं। १५।
गंगा बारा वरूषें वरी। सकळिकां मध्यें गोदावरी।
सिंहस्थीं महिमा थोरी। हें न्यून भारी तयासी। १६।
अयोध्या माया मथुरा। कांची आवंतिका करवीरा।
लोणहार हाटकेश्वर तुंगभद्रा। आणि पुष्करा कावेरी। १७।
कलीमाजी वैकुंठ साक्षात। गाढें क्षेत्र जगन्नाथ।
त्या देवासी नाहीं पाय हात। उणाव बहुत तयासी। १८।

गाढें श्रीशैल्यपर्वत । लक्षावया उदित ।
तेथें जीवासी करिजे घात । हा उणाव बहुत तयासी । १९ ।
गाढें क्षेत्र परियेसा । गोकर्ण सेतुबंधु महेशा ।
तयासी उणाव ऐसा । जे यमदिशा म्हणताती । २० ।
ऐसीं तीर्थें कोटीरासी । परि लांछन आहे सर्वांसी ।
पहिलें राहिजे उपवासी । मग डोईसी मुंडण । २१ ।
सकळ तीर्थांचा पारू । जोगा देखिला सागरू ।
तयासी उणाव आहे थोरू । योग येतो अमावास्ये । २२ ।
म्हणोनि पुसों आलों तुज । सकळ तीर्थांचें बीज ।
तें झडकरी सांग मज । देवा तुज जें प्रिय । २३ ।
ऐसी करोनि विनवणी । मग स्कंद लागला चरणीं ।
येरें उचलिला झडकरूनी । मग शूळपाणि हे बोलिले । २४ ।
पुत्रा तुवां जे केली विनंती । हेंचि गिरिजा पुसत होती ।
तरी सांगेन तुजप्रती । चित्त देऊनि परियेसीं । २५ ।
महिमा दरूशनाचा पूर्ण । एक लक्ष्मी जाणे खूण ।
शुक सनकादिक मुनि सज्जन । आणि वैष्णव जन प्रेमळ । २६ ।
जैसा कृपणाचा ठेवा । तैसें आर्त रे माझिया जीवा ।
पुत्र पुसिलें तुवां । तरी वृत्तांत बरवा सांगेन । २७ ।
मी बैसोनियां स्मशानीं । जयाचें नाम जपें ध्यानीं ।
तें दैवत आहे जये स्थानीं । चित्त देऊनि परियेसा । २८ ।
युगा अठ्ठावीसांवरी । आहे पुंडलिकाच्या द्वारीं ।
विठ्ठल उभा भीमातीरीं । विश्व तारी दरूशनें । २९ ।
घेऊनि तरूवरांची बुंथि । देव सेवा जाणविती ।
आदिकरोनी पार्वती । आम्हां वस्ति तये ठायीं । ३० ।

तेजें झळालें वैकुंठ। तयापरी चोखट।
पहा पंढरपूरें नीट। महिमा अद्‌भुत तिहीं लोकीं। ३१।
जेणें पीडिलें तिन्ही लोकां। त्यासि वधावया पावलों देखा।
ओढी काढोनी त्र्यंबका। श्रीहरि सखा स्मरिला। ३२।
घात करोनी त्रिपुरा। वधियेलें तिन्ही असुरां।
तेंचि तीर्थ भिवरा। सचराचरा तारक। ३३।
प्रतिदिनीं माध्यान्हीं। सकळ तीर्थें तिये स्थानीं।
भिवरे सुस्नात होऊनि। विठ्ठलचरणीं लागती। ३४।
तये क्षेत्रीं पाप घडे। ऐसें बोलतां जिव्हा झडे।
काय तुज सांगूं पुढें। ब्रह्म उघडें असे जेथें। ३५।
लोहो लागलिया परीसें। सोनें झालें एक सरिसें।
आतां पालटेल कैसें। भलतें तैसें जरी झालें। ३६।
एक वेळ पंढरीये जाऊन। मग भलतिये ठायीं राहो कां जन।
तो राहे वैकुंठींच जाण। कर्महीन जरी झाला। ३७।
ऐसें ऐकोनी उत्तर। स्कंद हरूषें निर्भर।
आदि करोनि ऋषीश्वर। पंढरपूर ठाकिती। ३८।
विष्णुदास नामा म्हणे। एक वेळ पंढरीये जाणें।
विठ्ठल धन्यावरी पाहणें। नाहीं येणें संसारा। ३९।

२११४. जाऊं नको जेथें तेथें। परी तुज मुक्तीचें आर्तें।
तुज मी सांगेन हित। देऊनि चित्त परियेसी। १।
शंभु अडसष्टी तीर्थांचें माहेर। सकळ सिद्धि ऋषीश्वर।
मध्यान्हकाळीं सुरवर। पंढरपूर ठाकती। २।
जाईं जाईं आलियारे। पांडुरंगीं राहें स्थिररे।
न लगती आणिक दैवतें रे। एक पुरे विठ्ठलची। ३।

तीर्थ क्षेत्र दैवतें। ऐसें नाहीं जेथें तेथें।
तिन्ही सर्वोत्तम जेथें। तें पैं क्षेत्र सांगेन। ४।
श्रीहरीच्या चोविस मूर्ति। विठ्ठल प्रेमदृष्टीं प्रीति।
सहस्र नामांवरती किर्ती। विठ्ठल दैवत जाणावें। ५।
रूद्रार्धांगी गौरी। जान्हवी असे शिरीं।
सर्वांग व्यापिनी भीमा सुंदरी। आले त्रिपुरारी ठाकोनी। ६।
कोटिजन्माचें पातक। नासे स्नान केलिया देख।
एवढें क्षेत्र अलौकिक। पांडुरंग भींवरा। ७।
काशीं त्यागिजे शरीर। हिंवे शिणलें केदार।
पाणी गोमतीचें क्षार। म्हणवोनि महिमा सम नाहीं। ८।
जन्म मरणावेगळें। वैकुंठ तुकिलें सगळें।
परि त्याहुनि आगळें। एक अक्षर जाणावें। ९।
गया भोंवुनि चौदापदी। तीं अनंतें वेणुनादीं।
काला केला गोविंदीं। हा दृष्टांत पहा पां। १०।
ज्याचेनि नांवें पिंडदान। त्यासी गयेसी गति जाण।
येथें करितां नाम स्मरण। सर्व पूर्वजां मुक्ति। ११।
कार्तिकीये आदित्यवारीं। जो पद्माळा स्नान करी।
त्यासी नाहीं येरझारी। नये पुढती संसारा। १२।
इंद्र येवढे परमेष्टी। तेथें मनुष्याच्या काय गोष्टी।
धन्य धन्य तो एक सृष्टीं। पंढरी दृष्टीं जो देखे। १३।
बरवें पुंडलीकें केलें। हें परब्रह्म रे अर्चिलें।
जगांत शांतवन केलें। परि नेटकें सर्वथा। १४।
तीर्थ सोपारें सधर। कष्ट न लगती अपार।
उपवासी निराहार। कीं क्षौर करणेंचि नलगे। १५।

येथें सुखें येणें जाणें । घेणें नलगे धरणें।
मनींचें मनोरथ पुरवणें । एके भेटीसाठीं । १६ ।
पूर्वजन्मीचा तापसी । तीर्थें केलीं पुण्यराशी ।
सहस्र शतें भोजनासी । देवां द्विजां भजिन्नला । १७ ।
शाळिग्रामाची पूजा करी। त्यासी प्रसन्न झाले हरि।
त्यासी दावितो पंढरी। पूर्व संस्कारी म्हणोनियां। १८ ।
जयासी नावडे पंढरी । तो पापिया दुराचारी ।
उपजोनियां संसारीं । येरझारीं शिणतो। १९ ।
त्यासी श्वान सूकर हांसती । म्हणती यासी कैसी पडली भ्रांती।
उपजोनियां मनुष्ययातीं । पंढरपूरपती नोळखे । २० ।
जो विन्मुख पंढरपुरा। त्याचा संग झणीं धरा।
मोडोनि सुकृताचा थारा । पाप शरीरासी तो गेला। २१ ।
जो पंढरीसी आर्तु। त्याची करा बरवी मातु।
अंतकाळीं पंढरीनाथु । यमपंथु चुकवील। २२ ।
बरवें समतुल्य वाळुवंट। वरी वैष्णव मिळाले घनदाट।
करिती हरिनामाचे बोभाट । वीर उद्भट विठ्ठलाचे । २३ ।
जे येथें प्रेमासी आतुर । ते चतुर्भुज होती नर ।
येवढें क्षेत्र पंढरपुर । महिमा थोर तिहीं लोकीं । २४ ।
अन्य क्षेत्रीं पाप कीजे। तें पुण्य क्षेत्रीं विनसिजे।
पुण्य क्षेत्रीं पाप कीजे । तें त्यागिजे पंढरीसी। २५ ।
पंढरीचें पातक । पंढरीसी नासे देख।
एवढें क्षेत्र अलौकिक। त्रिभुवनामाझारी । २६ ।
पैल विटेवरी सांवळा। विठोबा पहा पहा रे डोळां।
विघ्न घालोनि पायातळा । आणिक कळिकाळा दमेना । २७ ।

जप तप अनुष्ठान । नलगे जिवासी बंधन।
आणिक न करावें साधन । पहावे चरण विठोबाचे । २८ ।
देवा सांगे वसुंधरा । मी न भिये सप्तसागरा।
स्थावर जंगमादि सारा। नाहीं भार तयाचा । २९ ।
ज्यासी नावडे विठ्ठल वीरू। त्याचा मज भार थोरू।
त्यासी नरकीं होय थारू । तो असुर प्राणिया । ३० ।
ऐसा हा पंढरपुरपति । जिवंतु असतां देतो मुक्ति ।
मेलिया देतो ब्रह्मप्राप्ति । दोहींकडे सौरस । ३१ ।
येरां प्राणियां कष्ट थोर । परि तें न भरे उदर।
मेलिया यम किंकर । अष्टौप्रहर जाचिती। ३२ ।
ऐसा हा कैलासींचा राणा। गिरीजे स्कंदा सांगे खुणा।
तुम्ही आणिक मंत्र नेणां। या पांडुरंगावांचुनी। ३३ ।
विठ्ठल विठ्ठल म्हणतां । तुटती महापातकचळथा ।
विष्णुदास नामा विनवी संतां। सावधान व्हा जी म्हणतसे। ३४ ।

२११५. श्रोते म्हणती विष्णुदासा। या ब्रह्मांडींचा प्रळय कैसा।
पंढरीच्या भासा । नाश कीं नाहीं। १ ।
तंव नामा म्हणे सुदर्शनावरी । देवें रचिली पंढरी।
भक्तांसहित राज्य करी । रुक्मिणीवर । २ ।
तो परमात्मा गुणातीत। अपरोक्ष भक्तांसहित।
तेथें प्रळय हात जोडित। जयालागीं । ३ ।
जै ब्रह्मयाचें आयुष्य सरे। तै लया जाय चराचरें।
तै पंढरपूर मिळे । वस्तुमाजी । ४ ।
नामा म्हणे या खुणा। कळती संतजना।
इतर मायिक जना। नेणवती । ५ ।

२११६. कृत त्रेता द्वापार कली। ऐसा चौ युगांचा मेळीं।
तें महायुग शब्द आढळी। वेदांत शास्त्रीं। १
ऐसा ब्रह्मयाचा दिनांतर। तैसीच रात्र एक सहस्र।
तिसा दिवसांचा प्रखर। एक मास। २
ऐसे बारा मास। त्याचें एक वरूष।
शतभरी आयुष्य। ब्रह्मयाचें। ३
ऐसा ब्रह्मयाचा दिनांत। शत वरूषें गणीत।
ज्या प्रळयीं पोहत। मार्कंडेय उदकीं। ४
ऐसीं अठ्ठावीस युगें जाण। पंढरपुरासी झालीं पूर्ण।
जो कीं ब्रह्मयाचा दिन। प्रळय केला। ५
नामा म्हणे पंढरिची संख्या। सांगितली संत महंत लोकां।
लक्षुनि पादुका। विठोबाच्या। ६

२११७. आधीं रचिली पंढरी। मग वैकुंठ नगरी। १
जेव्हां नव्हतें चराचर। तैं होतें पंढरपुर। २
जेव्हां नव्हती गोदा गंगा। तेव्हां होती चंद्रभागा। ३
चंद्रभागेचे तटीं। धन्य पंढरी गोमटी। ४
नासिलीया भूमंडळ। उरे पंढरीमंडळ। ५
असे सुदर्शनावरी। म्हणुनि अविनाश पंढरी। ६
नामा म्हणे बा श्रीहरी। ते म्यां देखिली पंढरी। ७

२११८. महा मुक्ति क्षेत्र तीर्थांचें तारक। उपमेसी आणीक नाहीं दुजें। १
तें हें पंढरपुर प्रेमाचें भांडार। नामें निरंतर गर्जतसे। २
येवढें तीर्थ जवळी असतां पैं समर्थ। कोण भाग्यहत दैन्य भाकी। ध्रु०
जीवन्मुक्त ज्ञानी येथें पुंडलिकमुनि। बैसलासे ध्यानीं पर लक्षी। ३
योग्यांचे हृदयींचें निजध्यान नेटकें। तें जयाचेंनि सुखें वेडावलें। ४

पुण्यपावन भीमा दक्षिण वाहिनी । अमृत संजीवनी पुण्यराशी । ५ ।
आनंदरसकुपिका प्रत्यक्ष चंद्रभागा । दर्शनें न या गा गर्भवासा । ६ ।
स्वर्गीं मंदाकिनी लाजोनि राहिली । पाताळीं प्रवेशली भोगावती । ७ ।
सहस्रभाग भेंणें होउनि भागीरथी । सागरा मिळती झाली वेगीं । ८ ।
भक्तजन भाग्याची कीं सुख आरोग्याची । जें कां वैराग्याची जन्मभूमी । ९ ।
तेथें हरिखे निर्भर नामा संतांचे संगतीं । गीतीं गाय कीर्ति विठोबाची । १० ।

२११९. अवघें तीर्थ तीर्थरूप । परि तें विठ्ठल चरणीचें स्वरूप ।
विठ्ठल देखिलिया नि:पाप । जीवजंतु होताती । १ ।
एवढें क्षेत्र पांडुरंग । सर्वां तीर्थांमाजी अभंग ।
धरिलिया संतसंग । महादोष हरताती । २ ।
हरिकीर्तन करीं वेगीं । हेंचि उद्धरील जगालागीं ।
जें जें अनुसरलें पांडुरंगीं । तें तें गेलें वैकुंठा । ३ ।
नामा जपे सदा काळीं । रामकृष्ण नामावळी ।
विठ्ठल विठ्ठल हृदयकमळीं । जपतसे सर्वदा । ४ ।

२१२०. ऐका पंढरीचें महिमान । राउळ तितुकें प्रमाण ।
तेथील तृण आणि पाषाण । तेहि देव जाणावे । १ ।
ऐसी पंढरी मनीं जे ध्याती । त्यांसी तिहीं लोकीं गति ।
ते आणिका तीर्था जाती । तीर्थें वंदिती तयांसी । २ ।
वाराणसी चालिजे मासा । गोदावरी एक दिवसा ।
पंढरी पाऊल परियेसा । ऐसा ठसा नामाचा । ३ ।
शंकर सांगे ऋषीं जवळी । सकळ तीर्थें माध्यानकाळीं ।
येती पुंडलीकाजवळी । करिती अंघोळी वंदिती चरण । ४ ।
ऐसे तिर्थी पाप घडे । असत्य बोलतां जिव्हा झडे ।
नामा विनवी संतांपुढें । पंढरी पेठ न संडावी । ५ ।

२१२१. ऐसें तीर्थ कोणी दाखवा गोमटें। जेथें प्रत्यक्ष भेटे परब्रह्म। १
ऐसें क्षेत्र कोठे आहे त्रिभुवनीं। सकळां शिरोमणी चंद्रभागा। २
ऐसें तीर्थ कोणी दाखवावें। देखतांचि पावे सुख मन। ३
ऐसें तीर्थ कोणी दाखवा साजिरें। सदा प्रेमपुरें वोसंडत। ४
ऐसें तीर्थ कोणी दाखवा निर्मळ। परब्रह्म केवळ सकळां जीवां। ५
नामा म्हणे आम्हा दीनांचें माहेर। धन्य पंढरपुर गीतीं गातां। ६

२१२२. ऐसें तीर्थ कोणी दाखवा सुलभ। जेथें समारंभ हरिकथेचा। १
तें एक पंढरी विख्यात त्रिभुवनीं। सकळां शिरोमणी चंद्रभागा। २
ऐसें तीर्थ कोणी दाखवा सुखरूप। जेथें त्रिविध ताप हारपती। ३
ऐसें तीर्थ कोणीं दाखवा सुंदर। गरूड टकेभार विराजती। ४
ऐसें तीर्थ कोणीं दाखवा निर्मळ। जेथें नासे मळ दुष्टबुद्धि। ५
नामा म्हणे संतजनाचें माहेर। गातां मनोहर गोड वाटे। ६

२१२३. काय सांगूं तुझी करणी नारायणा। वेदपारायणा केशिराजा। १
पृथ्वीवरी तीर्थें आहेत अपार। परी पंढरिची सर एका नाहीं। २
जन्मोजन्मींचिया पातकां दरारा। चुके येरझारा एके खेपें। ३
ब्रह्मज्ञानेंवीण मोक्ष आहे भूतीं। वाचेसी ते घेती विठ्ठलनाम। ४
बेताळीसांसहित जातील वैकुंठा। नामा म्हणे भेटा विठ्ठलासी। ५

२१२४. ज्यासी विन्मुख संसार। तो करी मोक्षाचा विचार। १
आम्ही पंढरीचे लाठे। नवजो वैकुंठींचे वाटे। २
सांडोनि पंढरीची वारी। मोक्ष मागे तो भिकारी। ३
जन्मोजन्मींचा आळसी। तो मुक्तीतें अभिलाषी। ४
ताट ओगरिलें निकें। सांडोनि कोण जाय भीके। ५
जो कां नेणे नाम मोडी। तो मुक्तीतें चरफडी। ६
नामा म्हणे विष्णुदासां। झणीं भ्याल गर्भवासा। ७

२१२५. पाहातां देऊळाची पाठ। तीर्थें घडलीं तीनशें साठ । १ ।
स्नान करितां पद्माळे । उद्धरती सर्व कुळें । २ ।
सन्मुख पाहातां विठाई । त्यासी उपमा द्यावया नाहीं । ३ ।
ऐसा पंढरीचा महिमा। काय वर्णू म्हणे नामा। ४ ।

२१२६. अवघें हें पवित्र पांडुरंग क्षेत्र । सुखचि सर्वत्र भरलें असे। १ ।
अवघा हो विठ्ठल गीतीं गातां गोड। अवघें पुरवी कोड नामें एकें। २ ।
अवघें जे सांडोनि अनुसरले यातें। अवघें देतो त्यांतें आपुलें प्रेम। ३ ।
अवघी चित्तवृत्ति ठेविती याच्या पायीं । त्यातें अवघ्या बाहीं आलिंगितो। ४ ।
अवघें आपुलें मन दिले जिहीं यातें। असे त्या सांगातें मागें पुढें। ५ ।
अवघ्यासि अनुसरला अवघेंचि विसरला। अवघा नामा झाला सुखरूप। ६ ।

२१२७. पंढरीचे जन अवघे पावन। ज्या जवळी निधान पांडुरंग। १ ।
विठ्ठलनामें घेणें विठ्ठलनामें देणें । विठ्ठलनामें करणें सकळ काम। २ ।
विठ्ठलनामें क्रिया विठ्ठलनामें कर्म । हाचि प्रिय धर्म जया चित्ता। ३ ।
सभराभरित विठ्ठल मागें पुढें। जिकडे जाती तिकडे विठ्ठलचि। ४ ।
निरंतर गर्जती विठ्ठल पवाडे । पहाती निवाडे विठ्ठलरूप। ५ ।
विठ्ठलनाम सरतें विठ्ठलनाम पुरतें । विठ्ठल नाम ज्यातें भांडवल। ६ ।
विठ्ठलनामें करिती अवघा योग क्षेम। नित्य ज्यांचें प्रेम विठ्ठलनामीं। ७ ।
सदा हृदयीं भरित विठ्ठलाचें प्रेम। हर्षें विठ्ठलनाम गर्जताती। ८ ।
विठ्ठलनामीं गोडी धरोनी आवडी । विठ्ठलनामीं बुडी दिली जेणें। ९ ।
नामा म्हणे अवघें विठ्ठलचि झालें। विठ्ठलें दिधलें प्रेमसुख ।१०।

२१२८. धन्य पंढरीचे सकळही जन । जिहीं सख्य केलें जाण विठ्ठलपायीं। १ ।
विठ्ठल हा ध्यानीं विठ्ठल हा मनीं। विठ्ठल चिंतनीं रात्रंदिवस । २ ।
विठ्ठलेविण जया नगमे एक घडी । सर्वस्वें आवडी विठ्ठलाची। ३ ।

विठ्ठलची माता विठ्ठलचि पिता। भगिनी आणि भ्राता विठ्ठल ज्यांचा। ४ ।
विठ्ठलचि मित्र विठ्ठलचि पुत्र। विठ्ठल कुळगोत्र केला जिहीं। ५ ।
विठ्ठलचि क्रिया विठ्ठलचि कर्म। विठ्ठल सकळ धर्म कुळदैवत। ६ ।
गुज गौप्य जीवींचें विठ्ठला सांगावें। विठ्ठलें पुरवावें कोड त्यांचें। ७ ।
सर्वकाळ करणें विठ्ठलाचि कथा। विठ्ठल जडला चित्ता जयाचिया। ८ ।
विठ्ठल जागृतीं स्वप्नीं आणि सुषुप्तीं। अखंड वोथरती विठ्ठल विठ्ठल। ९ ।
ऐसा सर्वस्वेंसी विठ्ठल भजतां। सुख आलें हातां विठ्ठलाचें। १० ।
नामा म्हणे त्याचें चरणरेणु होऊन। झालो मी पावन म्हणे आतां। ११ ।

२१२९. वैकुंठीं पाहें तंव चतुर्भुज दिसे। परि सुंदर रूप तेथें नाहीं। १ ।
क्षिरसागरीं पाहें तों तेथें निद्रिस्त। परि सुंदर रूप तेथें नाहीं। २ ।
द्वारके पाहें तंव पाताळीं चरण। परि सुंदर रूप तेथें नाहीं। ३ ।
हृदयीं पाहें तंव अव्यक्तचि दिसे। परि सुंदर रूप तेथें नाहीं। ४ ।
नामा म्हणे ऐसा सर्व गुण संपूर्ण। पंढरीये उभा शोभतसे। ५ ।

२१३०. अंगाचि सेज की फणीची साति। सहस्रमुखे स्तुती करी शेष। १ ।
परि तुझे चरित्र तया नव्हे अकळित। तेथे माझे गीत कोण्हींकडे। २ ।
येता जाता देवा पाहे दृष्टीवरी। उभा असे दारी कर जोडुनि। ३ ।
तया गरुडा अकळ होसी किं गा देवा। तेथे माझा केवा कोण्हींकडे। ४ ।
लक्ष्मी थोरपण सांडूनि आपण। सेवी तुझे चरण अष्टौप्रहर। ५ ।
तियेसीही पूर्ण न लभे तुझी भेटि। तेथे माझी गोष्टी कोण्हींकडे। ६ ।
भुतभविष्यवर्तमान जाणे परमेष्टी। घडीता मोडीता सृष्टी न लगे वेळ। ७ ।
तोही गोकुळात न लभे तुझा अंत। तेथे मी पतित कोण्हींकडे। ८ ।
दिव्य चक्षू दृष्टी देउनि किरिटी। विश्वरूप भेटी केली तया। ९ ।
तोही तुज पाहाता जाला अलक्षु। तेथे हे चर्मचक्षु कोण्हींकडे। १० ।
मार्कंडेय भृगु लोमहर्षण अगस्ती। करीता तुझी स्तुती युगे गेली। ११ ।

ध्यानीही पाहाता न पवती योगी। तेथे मी भवरोगी कोण्हींकडे । १२ ।
ऐकोनि बोलणे केशवराज खुणे म्हणे। माझ्या नामस्मरणें तरसी नाम्या। १३ ।
जाई रे माझे नाम हृदयी धरुनी प्रेम । हेची तुज वर्म सांगितले नामया । १४ ।

२१३१. सनकादिक तुझ्या गोंधळासी येसी मनोरथ पुरविसी त्याचा। १ ।
दक्षणचरणी तोडरु गर्जे नामचरणी वाजे बाकी। २ ।
सकळही तीर्थे राहिली तेथे विश्रांति तये विषयी।
जानुजंघेवरी पीतांबरे मालगवी । पाहाता भक्त जाले सुखी ।
हे रूप देखोनी मदन आला पोटी । नामा म्हणे लागो दृष्टी। ३ ।

२१३२. तो पा गगनाचा गाभा। १ ।
चित्पदक चांगले। जिवे मोती देती ढाल। २ ।
मन चंदनाचि उटि । दृढ कस्तुरि ललाटी। ३ ।
अंतकाली ते पंढरि। नामदेव उभा हरि। ४ ।

२१३३. त्रिभुवनामाजी सुंदर। भुवती मुक्तीदायक पंढरपूर । १ ।
माझ्या विठोबाचे नाम बरवे रूप बरवे । आवडी घेतली माझी जीवे । ध्रु० ।
विटेवरी उभा नीट समचरणी । साजरे रूप ते म्या पाहिले नयनी ।
नामा म्हणे सर्व हा माझीया मनी । ते रूप आसनी भोजनी शयनी। ३ ।

२१३४. तापत्रये तापले शरीर मोडलें। वासना भांडिले मन माझे। १ ।
केशवा वेगळे न देखें मी सुख। पाहे तुझे मुख वेळोवेळा। २ ।
प्रेमाची साऊली पाहीन पंढरी। जाऊ महाद्वारी लोटांगणी। ३ ।
नामा म्हणे आम्हां शीणभाग कैचा। अनंत जन्माचा हरेल सर्व। ४ ।

२१३५. क्षणभरी मज न पडे विसर। तुज वारंवार नको देवा।
केशवा वेगळे न देखें मी सुख । पाहे तुझे मुख वेळोवेळा ।
प्रेमाची साऊली पाहीन पंढरी। जाऊ महाद्वारी लोटांगणी।

पुरे तुझा संग बोलू पुढे काय। नामा म्हणे पाय चुकऊ नको।
गगनी गरुडाचें वरिले। कैसा धावताहे हरिखे। १ ।
दवडा दवडी हरी धावता। ना भी नामया म्हणता। २ ।
यशवंत द्वारका राजा। नामा म्हणे स्वामी माझा। ३ ।

२१३६. नको तीर्थाटण पुराण श्रवण। नको ब्रह्मज्ञान शास्त्र बोधु। १ ।
अहर्निशी नाम जपा श्रीरामाचे। होईल दैवाचे शिरोमणी। २ ।
वर्णाश्रम धर्म नको आचरण। नको व्रतदान तपे काही। ३ ।
नको ध्यान स्थिती भावेवीण बोजा। नको देवपूजा एकनिष्ठ। ४ ।
नामा म्हणे नाम विठोबाचे गाता। ब्रह्म सायोज्यता आनायासे। ५ ।

२१३७. चारी वेद तुझ्या नांदती नगरीं। तेथें मी भिकारी काय वानूं। १ ।
वर्णितां पार नेणे चतुरानन। तेथें मी अज्ञान काय जाणें। २ ।
अंगलग सेवक शेषाच्या सारिखा। तेथें माझा लेखा कोणीकडे। ३ ।
कैलासींचा राणा करितसे ध्यान। तेथें भ्रांत मन कोठें रिघे। ४ ।
इंद्रासहित देव जेथें ओळंगणें। तेथें दास्य करणें घडे कांहीं। ५ ।
नामा म्हणे केशवा काय म्यां करावें। तुझे पायीं रहावें कैशापरी। ६ ।

२१३८. वेदां नकळे पार श्रुतीं अगोचर। उपनिषदां सार नकळेचि। १ ।
तो हरि गोकुळीं वसुदेवा कुळीं। यशोदेजवळी बाळकृष्ण। २ ।
ब्रह्मादिक वंदिती शिवादिक ध्याती। शास्त्रांसी तों गति न कळेचि। ३ ।
योग्यांचें चिंतन मुनींचे अंजन। शेषादिकां ध्यान सदा ज्याचें। ४ ।
पुराणें भागलीं आचारे श्रमलीं। बोलतां राहिलीं साधुवृंदें। ५ ।
नामा म्हणे तो हा विठ्ठल पंढरी। नाम मात्रें तारी सकळांसी। ६ ।

२१३९. सहस्र तोंडांचा तोहि भागियेला। अंत नाहीं ज्याला गुणालागीं। १ ।
तेथें मी पामर काय बोलूं वाणी। तुझी कीर्ति जनीं काय कैसी। २ ।
यथामति कांहीं बोलियलों बोल। तोचि हा विठ्ठल नामा म्हणे। ३ ।

२१४०. अगणित गुण वर्णिता पुराणें । पंढरीचे राणे ख्याती जगीं । १ ।
अलक्ष भेटी लक्षिताची नाहीं । पुंडलिकें कांहीं तप केलें । २ ।
युगें गेलीं अठ्ठावीस ते अझुनी । उभा चक्रपाणी राहिलासी । ३ ।
वेद म्हणती नेति पुराणें तें किती । भांबावल्या मती म्हणे नामा । ४ ।

२१४१. फेडूनि पीतांबर उभा दिगंबर । कटीं ठेवुनि कर वाळवंटीं । १ ।
मोतियांचे हार सांडुनि रत्नकीळा । तुळशीच्या माळा गळां घाली । २ ।
पर्यंक शयन शेषाचें आसन । सांडूनि निधान उभा विटे । ३ ।
सांडुनियां भक्त सनकादिकीं प्रेमा । कलियुगीं नामा आवडला । ४ ।

२१४२. वैकुंठ तें घर । सांडुनियां निरंतर । १ ।
तो हा पुंडलिका द्वारीं । उभा कर कटावरी । २ ।
क्षीरसागरींची मूर्ती । तो हा रूक्मिणीचा पती । ३ ।
नये योगियांचे ध्यानीं । छंदें नाचतो कीर्तनीं । ४ ।
नामा म्हणे आला । सवें परिवार आणिला । ५ ।

२१४३. सत्यसंकल्पाचा कर्ता जो विश्वाचा । अनाथ जीवांचा मायबाप । १ ।
पुंडलिकें तया आणिलें रंगणीं । कटावरी पाणि ठेवूनियां । २ ।
अणुरेणुमाजि व्यापूनि राहिला । अनंतत्व जाहला एकलाचि । ३ ।
नामा म्हणे वेद त्यालागीं बोभाय । जोडोनियां पाय उभा ठाके । ४ ।

२१४४. विठ्ठल कानडें बोलूं जाणे । त्याची भाषा पुंडलीक नेणे । १ ।
युगें अठ्ठावीस झालीं । दोघां नाहीं बोला बोली । २ ।
कर ठेवुनि कटावरी । उभा भिंवरेच्या तिरीं । ३ ।
नामा म्हणे स्वामी माझा । उभा भक्तांचिया काजा । ४ ।

२१४५. तुझिया सत्तेनें वेदांसी बोलणें । सूर्यासीं चालणें तुझिया बळें । १ ।
ऐसा तूं समर्थ ब्रह्मांडाचा धनी । वर्म हें जाणुनि शरण आलों । २ ।

मेघांनीं वर्षावें पर्वतीं बैसावें। वायूनें विचरावे सत्ते तुझे। ३ ।
नामा म्हणे कांहीं न हाले साचार। प्रभु तूं निर्धार पांडुरंगा। ४ ।

२१४६. अच्युता अनंता श्रीधरा माधवा। देवाआदिदेवा पांडुरंगा। १ ।
कृष्णा विष्णु हरि गोविंदा वामना। तूंचि नारायणा नामधारी। २ ।
मुकुंदा मुरारी प्रद्युम्ना केशवा। नाम सदाशिवा शांतरूपा। ३ ।
रूपातीत हरी दाखवीं सगुण। निरंतर ध्यान करी नामा। ४ ।

२१४७. पंढरीचा देव तत्सत् चित् अद्वय। तोचि बापमाय पांडुरंग। १ ।
सगुण निर्गुण दावि प्रकार। दाही अवतार निमित्तासी। २ ।
ऐसा माझा स्वामी समर्थ गोविंद। निरंतर छंद हरिनामीं। ३ ।
नामा म्हणे कांहीं न धरी लाज। भाविकांसी गुज कानीं सांगे। ४ ।

२१४८. हरि भोळा हरि भोळा। आम्हीं डोळां पाहिला। १ ।
हरि श्रेष्ट हरि श्रेष्ट। आम्हां कष्ट नाहीं ते। २ ।
हरि उदार हरि उदार। आम्हां धीर होईना। ३ ।
नामा म्हणे हरि दाता। आम्हां दासां रक्षितो। ४ ।

२१४९. आशा तृष्णा माया नाहीं लाथाडिल्या। म्हणावा तो भला कासयानें। १ ।
अमृत सेवितां मृत्यु पळे दुरी। सुख होय तरीं तेंचि नाम। २ ।
तेव्हां कोणी तरी धरावा सत्संग। होय पांडुरंग प्राप्ति सर्वा। ३ ।
अविश्वासी नर सर्वस्व पतिता। तारिसी अनंता म्हणे नामा। ४ ।

२१५०. श्रीधरा अनंता गोविंदा केशवा। मुकुंदा माधवा नारायणा। १ ।
देवकीतनया गोपिकारमणा। भक्त उद्धारणा केशिराजा। २ ।
मकरकुंडले श्रवणीं शोभती। येकावळी दिप्ती सृष्टि लोपे। ३ ।
नामा म्हणे तुझा न कळेची पार। भजती निरंतर भक्तजन। ४ ।

२१५१. अनंत हे कळा अनंत हे लीळा। अनंत जयाला वेद गाती। १ ।
तोचि पांडुरंग पंढरीचा राजा। धणी झाला वोजा भावबळें। २ ।
अनंत जयाच्या सेवा वोजावणी। नामरूप गुणीं नामातीत। ३ ।
नामा म्हणे अंत असेना जो कांहीं। सांपडतो पाहीं पंढरीये। ४ ।

२१५२. पुंडलिकाचे भेटीं भींवरेचे तटीं। परब्रह्म उभें वाळुवंटीं गे माये। १ ।
उभा विटेवरी कर कटावरी। उभा भीमातीरीं जगजेठी गे माये। २ ।
विठ्ठल कान्हा चरणीं वांकी तोडर। कासे पीतांबर पदकलीळा मनोहर गे माये। ३ ।
कान्हा विठ्ठल कान्हा प्रसन्नवदन थोर। जो आथी करूणाकर हरि नामया दातार। ४ ।

२१५३. खोळ बुंथीचा तो देवकीनंदन। उभा तो गे बाई। १ ।
नंदनंदन संताचें जीवन। उभा तो गे बाई। २ ।
कामिनी मनोहर नामया दातार। उभा तो गे बाई। ३ ।

२१५४. दोन्ही हात ठेवूनि कडवा। उभा भिवरेच्या थडवा। १ ।
हरि बरवया बरवया। विठोबा पंढरीच्या राया। २ ।
नामा म्हणे धांवा। देव आले याचि गावा। ३ ।

२१५५. पंढरी हे क्षेत्र पावन पवित्र। महिमा विचित्र त्रिभुवनीं। १ ।
पाहिलिया क्षणीं नासती पातकें। ऐसियासी तुके दुजें कोण। २ ।
तृण पक्षि सर्व झाले ऋषि देव। पहाती वैभव पंढरीचें। ३ ।
भूमि ते राहिली विष्णु चक्रावरी। वैकुंठिंची परी सर्व येथें। ४ ।
टाळ नृत्य घोष पताकांचे भार। गर्जे भीमातीर सर्वकाळ। ५ ।
पुंडलिकासाठीं ठाके केशिराज। भेटीनें सायुज्य त्यास देती। ६ ।
स्नानें उद्धरती दर्शनें प्रशस्तीं। वाचे नाम कीर्ति विठोबाची। ७ ।
नामा म्हणे लाभ थोर हा जोडतो। पंढरिसी येतो प्राणी त्यासी। ८ ।

२१५६. जगीं पेठा जाण असती अनेगा। अति सुरंगा वाखाणिती। १।
जंव तूं न देखसी पेठ द्वारकेची। श्रीरंगरायाची राजधानी। २।
द्वारकेची पेठ येथें स्वरूप चोख। बरवी वरवंट शोभत असे। ३।
तैसेंचि पंढरीयें सोपें बहु ठाण। संत सुलक्षण जाणताती। ४।
तयाचे दर्शनें लाभ कोटी गुणें झाला। भवसिंधु आटला हेळामात्रें। ५।
ऐसी पेठ निर्मिली देवें ही पंढरी। पुंडलीक द्वारीं उभा असे। ६।
या पेठेचा शेट्या पुंडलीक भक्त। नामा शरणागत केशवासी। ७।

२१५७. उदंड देखिली उदंड ऐकिली। उदंड वर्णिली क्षेत्र महिमा। १।
पंढरीसारिखे क्षेत्र नाही कोठे। प्रत्यक्ष वैकुंठ दाखविले। २।
ऐशी चंद्रभागा ऐसे भीमातीर। ऐसा विटेवर देव कोठे। ३।
ऐसा पुंडलिक ऐसे वाळवंट। ऐसा पांडुरंग आहे कोठे। ४।
ऐसे हरिदास ऐसा प्रेमरस। ऐसा नामघोष आहे कोठे। ५।
नामा म्हणे आम्हा अनाथाकारणे। पंढरी निर्माण केली देवे। ६।

२१५८. अच्युता अनंता गोविंदा। अरे मेघ:शामा तूं आत्मया रामा रे। १।
आत्मया तूं रामा रे। म्हणा म्हणा गोविंद नामा रे। २।
ऐसें तुझें ध्यान आम्हां रे। नामयाचा स्वामी पंढरीराणा रे। ३।

२१५९. पंढरीचें सुख आनंदें गर्जती। ध्यातसे पार्वती अखंडित। १।
भीमातीरीं उभा सखा पांडुरंग। देई अंगसंग अखंडित। २।
उशीर झाला काय कामकाजा। यावें अधोक्षजा अनिरूद्धा। ३।
नामा म्हणे पाहा पंढरीमाझारी। केशीराज तारी एकसरा। ४।

२१६०. निंबलोण करूं पंढरीच्या सुखा। आणिक पुंडलीका मायबापा। १।
पाहतां भूमंडळीं नाहीं आणिक। पांडुरंग क्षेत्रा वांचूनियां। २।
अणिमादी सिद्धि भक्तांचिये द्वारीं। होउनि कामारि वोळंगती। ३।
परलोकींचे येती परतोनी मागुते। सर्व सुख येथें भोगावया। ४।

मुक्तिपद कोणी नेघे फुकासाठीं । हिंडे वाळवंटीं दीनरूप । ५ ।
भक्तांचिया पायां पडतो पुढतो पुढती । मज करा सांगाती मोक्ष म्हणे । ६ ।
सत्य लोकीं जया सुखाची शिराणी । तें आम्हां अनुदिनीं प्रत्यक्ष दिसे । ७ ।
बंदी जन नामा उभा महाद्वारीं । कीर्ति चराचरीं वर्णितसे । ८ ।

२१६१. पंढरीचें सुख पाहतां एक घडी । वास कल्प कोडी वैकुंठींचा । १ ।
आणितां अनुमाना न पवे सरी । महिमा न कळे थोरी सहस्रमुखा । २ ।
हें सुख सुरवरां स्वप्नीं नाही दृष्टीं । जैसें वाळवंटीं तुम्हां आम्हां । ३ ।
धन्य चंद्रभागा पुण्य सरोवर । धन्य भीमातीर पुण्य भूमी । ४ ।
धन्य नरनारी गर्जती हरिनामें । ऐकोनि प्रेमें डोले शूळपाणी । ५ ।
धन्य वेणुनाद धन्य वृंदावन । धन्य तें महिमान क्षेत्रवासी । ६ ।
धन्य पंचक्रोशी धन्य आसपासी । दुमदुमी अहर्निशीं नामघोष । ७ ।
धन्य पशु पक्षि कीटक आणि भृंग । जयां अंगसंग पांडुरंगीं । ८ ।
धन्य ते तरूवर अवघे सान थोर । अवतरले अमर गुप्तरूपें । ९ ।
धन्य ते संसारीं वर्तती जीवन्मुक्त । जया आर्त असे पांडुरंगीं । १० ।
धन्य त्याचा वंश ज्या नामीं विश्वास । धन्य विष्णुदास नामा तेथें । ११ ।

२१६२. आम्हीं स्वर्गसुख मानूं जैसा ओक । देखोनियां सुख पंढरीचें । १ ।
नलगे वैकुंठ न वांछूं कैलास । सर्वस्वाची आस देवा पायीं । २ ।
नलगे संतति आणि धन मान । एक असे ध्यान विठोबाचें । ३ ।
सत्य कीं मायिक आमुचें बोलणें । तुझी तुज आण सांग हरि । ४ ।
जीवभाव आम्ही सांडूं ओंवाळूनी । नामा लोटांगणीं महाद्वारीं । ५ ।

## श्रीक्षेत्र पंढरीस पायी वारी सोहळा अभंग

२१६३. संसार बंधन केलें जेणें शून्य । तयासी अनन्य शरण रिघा । १ ।
मायबाप सखा विठ्ठल विसांवा । त्याचे पायीं ठेवा सदा मन । २ ।

निजबोधरूप तोचि ज्ञानदिप। आनंदस्वरूप बाप माझा। ३
नामा म्हणे त्याच्या संगतीचा वारा। पावे पैल पारा हेळामात्रें। ४

२१६४. तुम्ही आम्ही जाऊं चला। भेटूं जीवलगा विठ्ठला। १
विठो सांपडला फुका। जो दुर्लभ तिहीं लोकां। २
वेदपुराणासी वाड। तो हा भाविकांसी भीड। ३
नामा म्हणे वंदूं चरण। कांही पुसूं जिवींची खूण। ४

२१६५. पैल दक्षिणेचा वारा। येतां देखिले सामोरा। १
चला चला पंढरपुरा। विठोबारायाच्या नगरा। २
पायी संतांच्या लागत। पाचारितो पंढरिनाथ। ३
नामा म्हणे वेग करा। विठ्ठल भक्तांचा सोइरा। ४

२१६६. अभिमानें लोक जाती वाराणसी। आमुची मिरासी पंढरीये। १
तीर्थ व्रत नेम मज केशिराजा। पंढरीचा राजा वोळगावा। २
पाउला पाउलीं चालती मारग। उभा पांडुरंग मागें पुढें। ३
नामा म्हणे मज पंढरीं विसांवा। दर्शन केशवा पुरे मज। ४

२१६७. पैल ते पंढरी पैल ते पंढरी। पांढरीवरी काळी वसविली। १
सोंवळें हें ब्रह्म सुनिळ हें ब्रह्म। विद्युल्लता ब्रह्म पाहूं चला। २
नामा म्हणे माझा विठ्ठल हा डोळा। अर्धमात्रे जवळां पाहूं चला। ३

२१६८. उठाउठी जावों पंढरीस राहों। आनंदें क्षेत्र पाहों विठ्ठलाचें। १
नाम वदनीं घ्यावो चरण हृदयीं ध्यावो। रूप डोळां पाहों विठ्ठलाचें। २
जीवें भेटी घेवों आनंदभावें गावों। प्रेमसुख घेवों म्हणे नामा। ३

२१६९. पांडुरंगाचें नाम बरवें। आवडी घेतली माझ्या जीवें। १
कैसा देहुडा पाउलीं उभा। वेणुनादीं गोपाळ वेणु वाहे। २
आंगीं चंदन चर्चित माळा गळां। भाळीं शोभताहे कस्तुरीचा टिळा। ३
नामा म्हणे धन्य धन्य जिणें। एकवेळा पंढरी पाहणें। ४

करो दूर दुख सब के देवो सुख सारे। जय नामदेव हरे।
द्वारे तेरे आए भक्ति की दो भिक्षा। स्वामी...
दुर्मति सबकी नासी सुन्दर दो शिक्षा। जय नामदेव हरे।
हम अति मूढ़ अल्पज्ञ पूत हैं तेरे पिता। स्वामी...
चरण-कमल-रज देकर कर लो सपूत पिता। जय नामदेव हरे।
ना बलवन्त विनीत हूँ ना कुछ समझ पड़े। स्वामी...
तेरा छोड़ के दास द्वार अब किसके पड़े। जय नामदेव हरे।
गिनो कुकर्म ना मेरे किरपा दृष्टि करो। स्वामी...
राखिए लाज कृपाल हो सिर पर हाथ धरो। जय नामदेव हरे।
साष्टांग प्रणाम् करें तेरे द्वार खड़े। स्वामी...
तव चरणन मन राँचे भक्तों में मान बढ़े। जय नामदेव हरे।
जय नामदेव हरे स्वामी जय नामदेव हरे।
चार पदारथ पावे जो तेरी शरण पड़े।

२७९. हरि हरि भक्ति करो मन का मान हरो।
हिरदे ध्यान धरो मूरत नामदेव जी की।
पहली आरती दूध पिलाया। प्रकट चतुर्भुज दर्शन पाया। १।
दूसरी आरती छान छवाई। बेढी रूप धरयो हरि आई। २।
तीसरी आरती मन्दिर फेरा। भयो पण्डों को प्रेम घनेरा। ३।
चौथी आरती पाक बनाए। घृत पात्र लै पाछे धाए। ४।
पंचमी आरती गऊ जिवाई। गरुड चढ़े प्रभु भये सहाई। ५।
खष्टमी आरती सेज निकासी। जुग जुग पैज भक्त की राखी। ६।
सातवीं आरती जल भर लाए। मति अनुरूप दास जस गाए। ७।
जो जन नामदेव जी की आरती गावे। सकल मनोरथ पूरण पावे। ८।
हरि हरि भक्ति करो मन का मान हरो। हिरदे ध्यान धरो मूरत नामदेव जी की।

❖❖❖

# संत जनाबाई कृत अभंग

## ❖ नामसंकीर्तन माहात्म्य ❖

१. गातां विठोबाची कीर्ती। महापातकें जळती। १ ।
सर्व सुखाचा आगर । उभा असे विटेवर । २ ।
आठवितां पाय त्याचे । मग तुम्हां भय कैंचे। ३ ।
कायावाचामनें भाव । जनी म्हणे गावा देव । ४ ।

२. नाम विठोबाचें घ्यावें । मग पाउल टाकावें । १ ।
नाम तारक हें थोर। नामें तारिले अपार। २ ।
आजामेळ उद्धरिला । चोखामेळा मुक्तीस नेला। ३ ।
नाम दळणीं कांडणीं । म्हणे नामयाची जनी। ४ ।

३. जन्मा येऊनिया देख। करा देहाचें सार्थक। १ ।
वाचे नाम विठ्ठलाचें । तेणें सार्थक देहाचें । २ ।
ऐसा नामाचा महिमा। शेषा वर्णितां झाली सीमा। ३ ।
नाम तारक त्रिभुवनीं। म्हणे नामयाची जनी। ४ ।

४. नाम फुकट चोखट। नाम घेतां नये वीट। १ ।
जड शिळा ज्या सागरीं। आत्माराम नामें तारी। २ ।
पुत्रभावें स्मरण केलें। तया वैकुंठासी नेलें। ३ ।
नाममहिमा जनी जाणे। ध्यातां विठ्ठलचि होणें। ४ ।

५. एक नाम अवघें सार। वरकड अवघें ते असार। १ ।
म्हणोनियां परतें करा। आधीं विठ्ठल हें स्मरा। २ ।
जनी म्हणे देवाधिदेव। एक विठ्ठल पंढरीराव । ३ ।

६. माझा शिणभाग गेला। तुज पाहतां विठ्ठला। १ ।
पाप ताप जाती। तुझें नाम ज्याचे चित्तीं। २ ।

अखंडित नामस्मरण । बांधू न शके तया विघ्न। ३ ।
जनी म्हणे हरिहर । भजतां वैकुंठीं त्या घर । ४ ।

७. जपतप अनुष्ठान । न लगे हेहासी दंडण । १ ।
तुम्हां सांगते मी खूण । कथे उभा नारायण। २ ।
कुंचे ढाळा तयावरी । हरुषें नाचतो श्रीहरी । ३ ।
या, रे, घाले दंडवत । आला थोर लाभ येथें । ४ ।
बाहे उभारूनी टाळी । वाजवितां दोषा होळी। ५ ।
देव कथेसी सांपडे। दासी जनी पाया पडे । ६ ।

८. माझें मन विठोबाचे पायीं रंगलें । परतोनि पाहतां मीपण गेलें । १ ।
नामदेव वस्तू दाखविली कैसी । माया प्रपंचासी विसरले । २ ।
नामदेवें भक्ती शाश्वत केली। विठोबाची मूर्ती हृदयीं राहिली । ३ ।
नामाचे जनीस भक्तीचें वेड । संसाराचें कोडें सोडविलें । ४ ।

९. नाम विठोबाचें थोर । तरला कोळी आणि कुंभार । १ ।
ऐसी नामाची आवडी । तुटे संसाराची बेडी । २ ।
नाम गाय वेळोवेळां । दासी जनीसी नित्य चाळा। ३ ।

१०. येऊं ऐसें जाऊं। जनासंगें हेंचि दाऊं। १ ।
आपण करूं हरिकीर्तन । जाणोनी भक्तीचें जीवन । २ ।
नाम संशयछेदन । भवपाशाचें मोचन। ३ ।
जनी म्हणे हो देवासी । होईल त्याला कसणी ऐसी । ४ ।

११. हरिहर ब्रह्मादिक । नामें तरले तिन्ही लोक। १ ।
ऐसा कथेचा महिमा । झाली बोलायाची सीमा। २ ।
जपें तपें लाजविलीं । तीर्थें शरणागत आलीं। ३ ।
नामदेवा कीर्तनीं। ध्वजा आल्या स्वर्गाहुनी। ४ ।
देव श्रुतीं देती ग्वाही। जनी म्हणे सांगूं कायी। ५ ।

१२. व्हावें कथेसी सादर । मन करूनियां स्थीर । १ ।
बाबा काय झोंपी जातां । झोले चौऱ्यांशींचे खाता । २ ।
नरदेह कैसारे मागुता । भेटी नव्हे त्या सीताकांता । ३ ।
आळस निद्रा उठाउठी । त्यजा स्वरूपीं घाला मिठी । ४ ।
जनी म्हणे हरिचें नाम । मुखीं म्हणा धरूनि प्रेम । ५ ।

१३. काय हे करावे । धनवंतादि आघवे । १ ।
तुझें नाम नाहीं जेथें । नको माझी आस तेथें । २ ।
तुजविण बोल न मानीं । करीं ऐसें म्हणे जनी । ३ ।

१४. तो हा भक्तांचे तोडरीं । वाचे उच्चारितां हरी । १ ।
काम होऊनि निष्काम । काम भावभक्ति प्रेम । २ ।
तो हा पूर्ण काम होय । अखंडित नाम गाय । ३ ।
काम निष्काम झाला मनीं । वंदी नाचे दासी जनी । ४ ।

१५. निस्पृहाची मूर्ती । सखे, जनी ये अव्यक्ती । १ ।
भक्त वत्साचिये माय । नामा शिंपी त्याचे पाय । २ ।
म्हणे जनी दासी । माझी सखी आजी होती । ३ ।

१६. प्रेम क्षमा जया । घडे दंडवत पायां । १ ।
त्यासी देहभक्ती नुरे । स्वात्मसुख डोईवरी । २ ।
त्या मग समूळ जाला नाहीं । दंडवत जाला पां पायीं । ३ ।
देहातीत अगुणासी । म्हणे नव्हे जनी दासी । ४ ।

१७. निराकारींचें नाणें । शुद्ध ब्रह्मींचें ठेवणें । १ ।
प्रयत्नें काढिलें बाहेरी । संतसाधु सवदागरीं । २ ।
व्यास वसिष्ठ नारद मुनी । टांकसाळ घातली त्यांनीं । ३ ।
उद्धव अक्रूर स्वच्छंदीं । त्यांनी आटविली चांदी । ४ ।

केशव नामयाचा शिक्का। हारप चाले तिन्ही लोकां। ५।
पारख नामयाची जनी। वरती विठोबाची निशाणी। ६।

१८. विठ्ठल नामाची नाहीं गोडी। काळ हाणोनि तोंड फोडी। १।
गळा बांधोनि खांबासी। विंचू लाविती जिव्हेसी। २।
ऐसा अभिमानी मेला। नर्ककुंडीं थारा त्याला। ३।
नामा बोध करी मना। दासी जनी लागे चरणा। ४।

## भक्त पुंडलिक माहात्म्य

१९. भक्तामाजीं अग्रगणी। पुंडलिक महामुनी। १।
त्याचे प्रसादें तरले। साधुसंत उद्धरिले। २।
तोचि प्रसाद आम्हासीं। विटेवरी हृषिकेषि। ३।
पुंडलिक बापमाय। दासी जनी वंदी पाय। ४।

२०. पुंडलिक भक्तबळी। विठो आणिला भूतळीं। १।
अनंत अवतार केवळ। उभा विटेवरी सकळ। २।
वसुदेवा न कळे पार। नामयासवें जेवी फार। ३।
भक्त भावार्था विकला। दासी जनीला आनंद झाला। ४।

२१. भला भला पुंडलिका। तुझ्या भावार्थाचा शिक्का। १।
भलें घालूनियां कोडें। परब्रह्म दारापुढें। २।
घाव घातला निशाणीं। ख्याति केली त्रिभुवनीं। ३।
जनी म्हणे पुंडलिका। धन्य तूंचि तिहीं लोकां। ४।

२२. टाळ- मृदुंगाची ध्वनी। दिंड्या पताका घेऊनी। १।
संत जाती पंढरीसी। देव सामोरा ये त्यासी। २।
देऊनिया आलिंगन। त्याचा घेतो भागशीण। ३।
सर्व तीर्थांचे माहेर। जनी म्हणे पंढरपूर। ४।

२३. पंढरीचें सुख पुंडलिकासी आलें। तेणें हें वाढिलें भक्तालागीं। १।
भुक्ति मुक्ति वरदान दिधलें। तेंहि नाहीं ठेविलें आपणापाशीं। २।
उदार चक्रवर्ती बाप पुंडलिक। नामें विश्वलोक उद्धरिले। ३।

## श्री विठ्ठल माहात्म्य

२४. जन्म खातां उष्टावळी। सदा राखी चंद्रावळी। १।
राहीरुक्मिणीचा कांत। भक्तिसाठीं कण्या खात। २।
देव भुलले पांडुरंग। ऐसा जाणावा श्रीरंग। ३।
जनी म्हणे देवराज। करी भक्ताचें हो काज। ४।

२५. ऐसा आहे पांडुरंग। भोग भोगूनि निःसंग। १।
अविद्येनें नवल केलें। मिथ्या सत्यत्व दाविलें। २।
जैसी वांझेची संतति। तैसी संसार उत्पत्ति। ३।
तेथें कैंची बा धरिसी। ब्रह्मीं पूर्ण जनी दासी। ४।

२६. स्मरतांचि पावसी। तरी भक्तांसी लाधसी। १।
ऐसा नाहीं न घडे देवा। वांयां कोण करी सेवा। २।
न पुरतां आस। मग कोण पुसे देवास। ३।
कोठें चक्रपाणि। तुज आधीं लाही जनी। ४।

२७. देव देखिला देखिला। नामें ओळखुनी ठेविला। १।
तो हा विटेवरी देव। सर्व सुखाचा केशव। २।
जनी म्हणे पूर्ण काम। विठ्ठल देवाचा विश्राम। ३।

२८. अनंत लावण्याची शोभा। तो हा विटेवरी उभा। १।
पितांबर माळ गांठीं। भाविकांसी घाली मिठी। २।
त्याचे पाय चुरी हातें। कष्टलीस माझे माते। ३।
आवडी बोलें त्यासी। चला जाऊं एकांतासी। ४।
ऐसा ब्रह्मींचा पुतळा। दासी जनी पाहे डोळां। ५।

२९. पंढरपुराची होईन मी दासी। लागली आसोसी विठोपायीं। १ ।
पंढरपुराची होईन मी भोई। विठ्ठल रखुमाई चालतील। २ ।
पंढरपुराची होईन मी वाळू। खेळती गोपाळू मायबाप। ३ ।
पंढरपुराची होईन मी शेणी। घालोनी अंगणीं विठोबाच्या। ४ ।
पंढरपुराची होईन मी पायरी। येतां जातां हरी चरण लागे। ५ ।
पंढरपुराची होईन मी वाट। येतील अचाट संतजन। ६ ।
संतजन येती विठ्ठाल भेटासी। नामांकित दासी शरणागत। ७ ।

३०. बाप रखुमाबाई वर। माझें निजाचें माहेर। १ ।
तें हें जाणा पंढरपुर। जग मुक्तीचें माहेर। २ ।
तेथें मुक्ति नाहीं म्हणे। जनी न पाहे त्यांचे वदन। ३ ।

३१. विठु माझा लेंकुरवाळा। संगें गोपाळांचा मेळा। १ ।
निवृत्ती हा खांद्यावरी। सोपानाचा हात धरी। २ ।
पुढें चाले ज्ञानेश्वर। मागें मुक्ताई सुंदर। ३ ।
गोरा कुंभार मांडिवरी। चोखा जीवा बरोबरी। ४ ।
बंका कडियेवरी। नामा करांगुळी धरी। ५ ।
जनी म्हणे गोपाळा। करी भक्तांचा सोहळा। ६ ।

३२. आळवितां धांव घाली। ऐसी प्रेमाची भुकेली। १ ।
ते हे यशोदेच्या बाळा। बरवी पाहातसें डोळां। २ ।
विटेवरी उभी नीट। केली पुंडलिकें धीट। ३ ।
स्वानंदाचें लेणें ल्याली। पाहून दासी जनी धाली। ४ ।

३३. तुझ्या निजरूपाकारणें। वेडावलीं षड्दर्शनें। १ ।
परि सोय न कळे त्यांसी। समीप असतां देवासीं। २ ।
चारीश्रमें हो कष्टती। वेदशास्त्रें धुंडाळिती। ३ ।

परि कवणें रीति तुला । न जाणवे जी विठ्ठला । ४ ।
तुझी कृपा होय जरी । दासी जनी ध्रुपद करी । ५ ।

३४. पंढरी सांडोनि जाती वाराणसी । काय सुख त्यांसी आहे तेथें । १ ।
तया पंचक्रोसी म्हणती मरावें । मरोनियां व्हावें जीवन्मुक्त । २ ।
नको गा विठोबा मज धाडूं काशी । सांगेन तुजपाशीं ऐक आतां । ३ ।
मरचीमान्न वेरण स्तंभीं घाली । घालोनियां गाळी पापपुण्य । ४ ।
जावोनियां तेथें प्रहर दोन रात्रीं । सत्य मिथ्या श्रोतीं श्रवण करा । ५ ।
आई आई बाबा म्हणती काय करूं । ऐसें दु:ख थोरू आहे तेथें । ६ ।
इक्षुदंड घाणा जैसा भरी माळी । तैसा तो कवळी काळनाथ । ७ ।
लिंगदेहादिक करिती कंदन । तेथील यातना नको देवा । ८ ।
न जाय तो जीव एकसरी हरी । रडती नानापरी नानादु:खे । ९ ।
अमरादिक थोर थोर भांबावले । भुलोनियां गेले मुक्तीसाठी । १० ।
ती ही मुक्ति माझी खेळे पंढरीसी । लागतां पायांसी संतांचिया । ११ ।
ऐसिये पंढरी पहाती शिखरीं । आणि भीमातीरीं मोक्ष आला । १२ ।
सख्या पुंडलिका लागतांचि पाया । मुक्ति म्हणे वांयां गेलें मी कीं । १३ ।
घर रिघवणी मुक्ति होय दासी । मोक्ष तो पाठीसी धांव घाली । १४ ।
मोक्ष सुखासाठी मुक्ति लोळे । बीं नेघे कोणी कदा काळीं । १५ ।
मोक्ष मुक्ति जिहीं हाणितल्या पायीं । आमुची ती काय धरिती सोयी । १६ ।
समर्थाचे घरी भिक्षा नानापरी । मागल्या पदरीं घालिताती । १७ ।
अंबोल्या सांडोनी कोण मागे भीक । साम्राज्याचें सुख तुझें । १८ ।
जनी म्हणे तुज रखुमाईची आण । जरी मज क्षण विसंबसी । १९ ।

## ❖ करूणा ❖

३५. येगे माझे विठाबाई । कृपादृष्टीनें तूं पाहीं । १ ।
तुजविण न सुचे कांही । आतां मी वो करूं कांही । २ ।

माझा भाव तुजवरी। आतां रक्षीं नानापरी । ३ ।
येई सखये धांउनी । म्हणे नामयाची जनी। ४ ।

३६. येग येग विठाबाई। माझे पंढरीचे आई । १ ।
भीमा आणि चंद्रभागा। तुझे चरणींच्या गंगा । २ ।
इतुक्यासहित त्वां बा यावें। माझे रंगणीं नाचावें। ३ ।
माझा रंग तुझे गुणीं । म्हणे नामयाची जनी। ४ ।

३७. आतां वाट पाहूं किती। देवा रुक्माईच्या पती। १ ।
येंई येंई पांडुरंगे। भेटी देई मजसंगें। २ ।
मी बा बुडतें भव जळीं । सांग बरवी ब्रीदावळी । ३ ।
राग न धरावा मनीं । म्हणें नामयाची जनी । ४ ।

३८. हात निढळावरी ठेवुनी। वाट पाहें चक्रपाणी । १ ।
धांव धांव पांडुरंगे । सखे जिवलगे अंतरंगे। २ ।
तुजवांचुनि दाही दिशा । वोस मज जगदीशा। ३ ।
हांसे करूं नको जनासी । म्हणे नामयाची दासी। ४ ।

३९. पाय जोडूनि विटेवरी। कर ठेउनी कटावरी। १ ।
रूप सांवळें सुंदर। कानीं कुंडलें मकराकार। २ ।
गळां वैजयंती माळा। तो हा मदनाचा पुतळा। ३ ।
गरुड सन्मुख उभा। म्हणे जनी धन्य शोभा। ४ ।

४०. सख्या घेतलें पदरीं। आतां न टाकावें दुरी । १ ।
थोरांचीं उचितें । हेचि काय सांगों तूंते । २ ।
ब्रह्मियाच्या ताता। सज्जना लक्षुमीच्या कांता । ३ ।
आपुली म्हणवूनि। आपंगावी दासी जनी। ४ ।

४१. गंगा गेली सिंधुपाशीं । त्याने अव्हेरिलें तिसी । १ ।
तरी तें सांगावें कवणाला । ऐसें बोलें बा विठ्ठला । २ ।
जळ कोपे जलचरा । माता अव्हेरी लेंकुरा । ३ ।
जनी म्हणे शरण आलें । अव्हेरितां ब्रीद गेलें । ४ ।

४२. माझी आंधळ्याची काठी । अडकली कवणे बेटीं । १ ।
आतां सांगूं मी कवणासी । धांवे पावें हृषिकेशी । २ ।
तुजवांचुनी विठ्ठला । कोणी नाहींरे मजला । ३ ।
माथा ठेवीं तुझे चरणीं । म्हणे नामयाची जनी । ४ ।

४३. कां गा न येसी विठ्ठला । ऐसा कोण दोष मला । १ ।
मायबाप तूंचि धनी । मला सांभाळीं निर्वाणीं । २ ।
त्वां बा उद्धरिले थोर । तेथें किती मी पामर । ३ ।
दीनानाथा दीनबंधू । जनी म्हणे कृपासिंधू । ४ ।

४४. अगा रुक्मिणीनायका । सुरा असुरा प्रिय लोकां । १ ।
ते तूं धांवें माझे आई । सखे साजणी विठाबाई । २ ।
अगा शिवाचिया जपा । मदनताता निष्पापा । ३ ।
आपुली म्हणवुनी । अपंगावी दासी जनी । ४ ।

४५. नाहीं केली तुझी सेवा । दुःख वाटतसे जिवा । १ ।
नष्ट पापीण मी हीन । नाहीं केलें तुझें ध्यान । २ ।
जें जें दुःख झालें मला । तें त्वां सोसिलें विठ्ठला । ३ ।
रात्रंदिवस मजपाशी । दळूं कांडूं लागलासी । ४ ।
क्षमा करी देवराया । दासी जनी लागे पायां । ५ ।

४६. येरे येरे माझ्या रामा । मनमोहन मेघःश्यामा । १ ।
संतमिसें भेटी । देंई देंई कृपा दृष्टी । २ ।

आमची चुकवी जन्मव्याधी। आम्हां देंई हो समाधी। ३।
जनी म्हणे चक्रपाणि। करीं ऐसी हो करणी। ४।

४७. अहो नारायणा। मजवरी कृपा कां कराना। १।
मी तो अज्ञानाची राशी। म्हणोन आलें पायांपाशीं। २।
जनी म्हणे आतां। मज सोडवीं कृपावंता। ३।

४८. ऐक बापा हृषिकेशी। मज ठेवीं पायांपाशीं। १।
तुझें रूप पाहीन डोळां। मुखीं नाम वेळोवेळां। २।
हातीं धरिल्याची लाज। माझें सर्व करीं काज। ३।
तुजविण देवराया। कोणी नाहीं रे सखया। ४।
कमळापति कमळपाणी। दासी जनी लागे चरणीं। ५।

४९. तुझे पाय माझी डोई। ऐसी करी विठाबाई। १।
आपुल्या ब्रीदाचा कैवारी। विठ्ठल उभा महागरुडापारी। २।
जनी म्हणे शरण आले। पाय पाहातां निवाले। ३।

५०. जोडते लेकरू माता अंगीकारी। मूढ ते अकेरी काय, देवा। १।
नीच पदी दासी संतांच्या घरीची। महिमा सेवेची लाधलीये। २।
थोराचा सेवक गांजिल्या निर्वाणीं। नांवासाठी धनी धांवा घाली। ३।
वेद वाखाणिले स्वामीचे पवाडे। अनाथ बापुडे तारियेले। ४।
जनी म्हणे आतां न विचारी उणे। लोह परिसानें शुद्ध केला। ५।

५१. पोट भरूनी व्यालासी। मज सांडुनी कोठें जासी। १।
धीरा धरा पांडुरंगा। मज कां टाकिलें निःसंगा। २।
ज्याचा जार त्यासी भार। मजला नाहीं आणिक थार। ३।
विठाबाई मायबहिणी। तुझे कृपें तरली जनी। ४।

५२. अविद्येच्या रात्रीं । आडकले अंधारीं । १ ।
तेथुनी काढावें गोविंदा । यशोदेच्या परमानंदा । २ ।
तुझें सन्निधेचे पासी । ठाव नाहीं अविद्येसी । ३ ।
तुझे संगती पावन । उद्धरिले ब्रह्में पूर्ण । ४ ।
अजामेळ शुद्ध केला । म्हणे दासी जनी भला । ५ ।

५३. धन गोत कलत्र माय । सर्व जोडी तुझे पाय । १ ।
सखा तुजवीण पाहीं । दुजा कोणी मज नाहीं । २ ।
माझी न करावी सांडणी । म्हणे तुझी दासी जनी । ३ ।

५४. मी वत्स माझी गायी । नये आतां करूं काई । १ ।
तुम्हीं तरी सांगा कांहीं । शेखी विनवा विठाबाई । २ ।
येंई माझिये हरणी । चुकलें पाडस दासी जनी । ३ ।

५५. सख्या पंढरीच्या राया । घडे दंडवत पायां । १ ।
ऐसें करीं अखंडीत । शुद्ध प्रेम शुद्ध चित्त । २ ।
वेध माझ्या चित्ता । हाचि लागो पंढरीनाथा । ३ ।
जावें ओंवाळुनी । जन्मोजन्मीं म्हणे जनी । ४ ।

५६. कां गा उशीर लाविला । माझा विसर पडिला । १ ।
तुजवरी संसार । बोळविले घरदार । २ ।
तो तूं आपुल्या दासासी । म्हणे जनी न विसंबसी । ३ ।

५७. किती सागूं तूंतें । बुद्धि शिकवणें हें मातें । १ ।
सोमवंशाच्या भूषणा । प्रतिपाळीं हर्षें दीनां । २ ।
शिकवावें तूंतें । हाचि अपराध आमुतें । ३ ।
स्वामीलागीं धीट ऐसी । म्हणती शिकवी जनी दासी । ४ ।

५८. शिणल्या बाह्या आतां। येऊनियां लावीं हाता। १।
तूं माझें वो माहेर। काय पहातोसी अंतर। २।
वोंवाळुनी पायां। जिवेंभावें पंढरीराया। ३।
धर्म ताता धर्म लेंकी। म्हणे जनी हें विलोकीं। ४।

५९. योग न्यावा सिद्धी। सकळ गुणाचिया निधी। १।
अरूपाच्या रूपा। सांब राजाचिया जपा। २।
ब्रह्मियाच्या ताता। म्हणे जनी पंढरीनाथा। ३।

६०. माय मेली बाप मेला। आतां सांभाळीं विठ्ठला। १।
मी तुझें गा लेकरूं। नको मजशीं अव्हेरूं। २।
मतिमंद तुझी दासी। ठाव द्यावा पायांपाशीं। ३।
तुजविण सखे कोण। माझें करील संरक्षण। ४।
अंत किती पाहासी देवा। थोर श्रम झाला जीवा। ५।
सकळ जिवाच्या जीवना। म्हणे जनी नारायणा। ६।

६१. काय करूं या कर्मासी। धांव पाव हृषिकेशी। १।
नाश होतो आयुष्याचा। तुझें नांव नये वाचा। २।
काय जिणें या देहाचें। अखंड अवघ्या रात्रीचें। ३।
व्यर्थ कष्टविली माता। तुझें नाम नये गातां। ४।
जन्म मरणाचें हरी दु:ख। म्हणे जनी दाखवीं मुख। ५।

६२. अहो ब्रह्मांड पाळका। ऐकें रुक्मिणीच्या कुंका। १।
देवा घेतलें पदरीं। तें तूं टाकूं नको दुरी। २।
होतें लोकांमध्यें निंद्य। तें त्वां जगांत केलें वंद्य। ३।
विनवीतसे दासी जनी। परिसावीं माझी विनवणी। ४।

६३. हाचि नेम माझा न फिरे माघारी। राहिले शेजारीं गोविंदाच्या । १ ।
धन्य माझा जन्म केलें, रे बा,येणे विटेवरी जेणे वस्ती केली । २ ।
नामयाची जनी भक्तीचें अजंन लाधलें निधान विटेवरी । ३ ।

६४. रामनामावीण अहो तें शरीर। त्यांचे जळो थोरपण येथें। १ ।
जळो त्याचें ध्यान जळो ते बोलणें। पहिल्या वदन स्नान कीजे। २ ।
नामयाची जनी म्हणे या पुरुषासी। प्रसवली कैसे नेणो त्यातें। ३ ।

६५. येंई जीवाचिया जीवा। रामा देवाचिया देवा। १ ।
सर्व देव बंदीं पडिले। रामा तुम्ही सोडविले। २ ।
मारूनियां लंकापती। सोडविली सीता सती। ३ ।
देवा तुमची ऐसी ख्याती। जनी म्हणे वर्णु किती। ४ ।

६६. अहो देवा हरिहर। उतरीं आम्हां भवपार। १ ।
देवा आम्ही तुझे दास। करूं वैकुंठीं वो वास। २ ।
जनी म्हणे कल्पवृक्ष। देव दुष्टासी पैं भक्ष। ३ ।

६७. शरण आले नारायणा। आतां तारीं हो पावना। १ ।
शरण आला मारुतिराया। त्याची दिव्य केली काया। २ ।
शरण प्रल्हाद तो आला। हिरण्यकश्यपू मारिला। ३ ।
जनी म्हणे देवा शरण। व्हावें भल्यानें जाणोन। ४ ।

६८. ऐक बापा माझ्या पंढरीच्या राया। कीर्तना आलेया आर्तभूतां। १ ।
माझ्या दुणेदारा पुरवीं त्याची आस। न करीं निरास आर्तभूतां। २ ।
त्रैलोक्याच्या राया सख्या उमरावा। अभय तो द्यावा कर तयां। ३ ।
जैसा चंद्रश्रवा सूर्य उच्चैश्रवा। अढळपद ध्रुवा दिधलेंसे। ४ ।
उपमन्यु बाळका क्षीराचा सागरू। ऐसा तूं दातारू काय वानूं। ५ ।
म्हणे दासी जनी आलें या कीर्तनीं। तया कंटाळुनी पिटूं नका। ६ ।

६९. गजेंद्रासी उद्धरिलें । आम्हीं तुझें काय केलें । १ ।
तारिली गणिका । तिहीं लोकीं तुझा शिक्का । २ ।
वाल्हा कोळी अजामेळ । पापी केला पुण्यशीळ । ३ ।
गुणदोष मना नाणीं । म्हणे नामयाची जनी । ४ ।

७०. काय करूं पंढरीनाथा । काळ साह्य नाहीं आतां । १ ।
मज टाकिलें परदेशी । नारा विठा तुजपाशीं । २ ।
श्रम बहु झाला जीवा । आतां सांभाळीं केशवा । ३ ।
कोण सखा तुजवीण । माझें करी समाधान । ४ ।
हीन दीन तुझे पोटीं । जनी म्हणे द्यावी भेटी । ५ ।

## आर्तता

७१. तुझे पाय रूप डोळा । नाहीं देखिलें गोपाळा । १ ।
काय करूं या कर्मासी । नाश होतो आयुष्यासी । २ ।
जन्मा येऊनियां दुःख । नाहीं पाहिलें श्रीमुख । ३ ।
लळे पुरविसी आमुचे । म्हणे जनी ब्रीद साचें । ४ ।

७२. वाट पाहतें मी डोळां । कां गा न येसी विठ्ठला । १ ।
तूं वो माझी निज जननी । मज कां टाकियेलें वनीं । २ ।
धीर किती धरूं आतां । कव घालीं पंढरिनाथा । ३ ।
मला आवड भेटीची । धणी घेईन पायांची । ४ ।
सर्व जिवांचे स्वामिणी । म्हणे जनी माय बहिणी । ५ ।

७३. विठोबारायाच्या अगा लेकवळा । जाउनी कळवळा सांगा माझा । १ ।
विठोबारायाच्या अगा मुख्य प्राणा । भेटवीं निधाना आपुलिया । २ ।
अगे क्षेत्र माये सखे पंढरिये । मोकलीते पाय जीव जातो । ३ ।
विश्वाचिये माते सुखाचे अमृत । सखा पंढरिनाथ विनवी तरी । ४ ।
तूं मायबहिणी देवाचे रुक्मिणी । धरोनियां जनी घालीं पायीं । ५ ।

७४. कां गे निष्ठुर झालीसी । मुक्या बाळातें सांडिसी । १ ।
तुज वांचोनिया माये । जीव माझा जावों पाहे । २ ।
मी वत्स माझी माय । नये आतां करूं काय । ३ ।
प्राण धरियेला कंठीं । जनी म्हणे देंई भेटी । ४ ।

७५. माझिये जननी हरिणी । गुंतलीस कवणे वनीं । १ ।
मुकें तुझें मी पाडस । चुकलें माये पाहें त्यास । २ ।
चुकली माझिये हरिणी । फिरतसे रानोरानीं । ३ ।
आतां भेटवा जननी । विनवितसे दासी जनी । ४ ।

७६. तान्हें वत्स जेवी गाउली लागुनी तैसे माझे मनीं पंढरीनाथा । १ ।
धन्य माझा जन्म केलें, रे बा, येणें विटेवरी जेणे वस्ती केली । २ ।
नामयाची जनीसी भक्तीचेच वेड साधलें निधान विटेवरी । ३ ।

७७. चिंतनीं चित्ताला । लावी मनाच्या मनाला । १ ।
उन्मनीच्या मुखा आंत । पांडुरंग भेटी देत । २ ।
कवटाळुनी भेटी पोटीं । जनी म्हणे सांगूं गोष्टी । ३ ।

७८. पुंडलिकें नवल केलें । गोपीगोपाळ आणिले । १ ।
हेंचि देंई हृषिकेशी । तुझें नाम अहर्निशीं । २ ।
नलगे आणिक प्रकार । मुखीं हरी निरंतर । ३ ।
रूप न्याहाळिन डोळां । पुढें नाचेन वेळोवेळां । ४ ।
सर्वांठायीं तुज पाहें । ऐसें देऊनि करीं साह्य । ५ ।
धांवा करितां रात्र झाली । दासी जनीसी भेट दिली । ६ ।

७९. पक्षी जाय दिगंतरां । बाळकांसी आणी चारा । १ ।
घार हिंडते आकाशीं । झांप घाली पिल्लापासीं । २ ।
माता गुंतली कामासी । चित्त तिचें बाळापाशीं । ३ ।

वानर हिंडे झाडावरी। पिलीं बांधुनी उदरीं। ४।
तैंसी आम्हासी विठ्ठल माये। जनी वेळोवेळां पाहे। ५।

८०. बाळे भोळे ठकविशी। तें तंव न चले आम्हांपाशीं। १।
गर्व धरिसी नामाचा। सोहं सोहं गर्जे वाचा। २।
आशा तृष्णा तुम्हांपाशीं। नाहीं म्हणे जनी दासी। ३।

८१. प्रहर एक रात्र उरलियावरी। येऊनिया शेजारीं बैसला जे। १।
उठी, वोल जानई घाली वो दळण। आवडीचें गाणें गाऊं दोघे। २।
उठविला मानेखालीं घालुनी हात। अंगें नेसवीत लुगड्यासी। ३।
दळणाची पाटी अंगे उचलोनी। शेजारी बैसोनि दळूं लागे। ४।
सुखरूप असावी माझी जनी दासी। अंगें मी सेवेसी करीन तिच्या। ५।
माझें सर्व काम करी चक्रपाणी। तेथें कैंची जनी नामयाची। ६।

८२. जनी म्हणे पांडुरंगा। माझ्या जीवींच्या जीवलगा।
विनविते सांगा। महिमा साधुसंतांचा। १।
कैसी वसविली पंढरी। काय महिमा भीमातीरीं।
पुंडलिकाच्या द्वारीं। कां उभा राहिलासी। २।
कैसा आला हा गोविंद। कैसा झाला वेणुनाद।
कैसा येउनी नारद। उभा कां राहिला। ३।
कृपा करा नारायणा। सांगा अंतरींच्या खुणा।
येऊं दे करूणा। दासी जनी विनवितसे। ४।

८३. देव तारक तारक। देव दुष्टांसी मारक। १।
गीतेमध्ये आदि अंत। ऐसें बोले तो भगवंत। २।
शत्रुलागीं आधीं मारी। भक्तसंकटीं रक्षी हरी। ३।
जनी म्हणे कृपा करी। भाव पाहोन अंतरीं। ४।

८४. ज्याचा सुखा हरी । त्यावरी विश्व कृपा करी । १ ।
उणें पडों नेदी त्याचें । वारें सोसी आघाताचें । २ ।
तयावीण क्षणभरी । कदा आपण नव्हे दुरी । ३ ।
अंगा आपुले ओढोनी । त्याला राखे जो निर्वाणीं । ४ ।
ऐसा अंकित भक्तांसी । म्हणे नामयाची दासी । ५ ।

८५. देव भावाचा लंपट । सोडुनी आला हो वैकुंठ । १ ।
पुंडलिकापुढें उभा । सम चरणांची शोभा । २ ।
हातीं चक्र पायीं वांकी । मुख भक्तांचे अवलोकीं । ३ ।
उभा बैसे न सर्वथा । पाहे कोडें भक्त कथा । ४ ।
सर्व सुखाचा सागर । जनी म्हणे शारंगधर । ५ ।

## ❁ भक्तवत्सलता ❁

८६. झाडलोट करी जनी । केर भरी चक्रपाणि । १ ।
पाटीं घेऊनियां शिरीं । नेऊनियां टाकी दुरी । २ ।
ऐसा भक्तिसी भुलला । नीच कामें करूं लागला । ३ ।
जनी म्हणे विठोबाला । काय उतराई होऊं तुला । ४ ।

८७. पाणियाचे वाटे । विठो घाली नेटे । १ ।
घागर घेऊनी हातांत । पाणी ओती हंडियांत । २ ।
ऐसा येरझारा करी । भरल्या रांजण - घागरी । ३ ।
पाणी पुरे, पांडुरंगा । दासी जनीच्या अंतरंगा । ४ ।

८८. चोखा मेळ्याचिये संगें । मेलें ढोर ओढी अंगें । १ ।
सेना न्हाव्या उशीरा झाला । न्हाईपन अंगी ज्याला । २ ।
दळी कांडी वाहे पाणी । बोले नामयाची जनी । ३ ।

८९. पूर्वी काय तप नेणें पैं हो केलें । निधान जोडिलें पंढरीचें । १ ।
येऊनियां देव दळूं लागे अंगें । रखुमाईचा संग दूर केला । २ ।

तैसाचि पैं संगें येऊनि बाहेरी। वेंचोनियां भरी शेणी अंगें । ३ ।
ओझें झालें म्हणूनि पाठी पितांबरी। घेऊनियां घरीं आणितसे । ४ ।
ऐसें जेथें काम करी चक्रपाणि। तेथें कैंची जनी नामयाची । ५ ।

९०. एकटी तूं गाणें गासी । दुजा शब्द उमटे पाशीं । १ ।
कोण गे तुझ्या बरोबरी । गाणें गाती निरंतरीं । २ ।
पांडुरंग माझा पिता । रखुमाई झाली माता । ३ ।
ऐशियाच्या घरीं आलें । जनी म्हणे धन्य झालें । ४ ।

९१. जनी डोईनें गांजली । विठाबाई धाविन्नली । १ ।
देव हातें बुचडा सोडी । उवा मारीतसे तांतडी । २ ।
केश विंचरुनी मोकळे केले । जनी म्हणे निर्मळ झालें । ३ ।

९२. जनी बैसली न्हायाला । पाणी नाहीं विसणाला । १ ।
घागर घेउनी पाण्या गेली । मागें मागें धांव घाली । २ ।
घागर घेऊनियां हातीं । पाणी रांजणांत ओती । ३ ।
ऐशा येरझारा केल्या । रांजण घागरी भरिल्या । ४ ।
पाणी पुरे पांडुरंगा । दासी जनीच्या अंतरंगा । ५ ।

९३. एके दिवशीं न्हावयास । पाणी नव्हतें विसणास । १ ।
देव धांवोनियां आले । शीतळ उदक घे घे बोले । २ ।
आपुल्या हातें विसणीं । घाली जनीच्या डोयी पाणी । ३ ।
माझ्या डोईच्या केसांस । न्हाणें नव्हतें फार दिवस । ४ ।
तेणें मुरडी केसांस । कां म्हणे उगीच बैस । ५ ।
आपुल्या हातें वेणी घाली । जनी म्हणे माय झाली । ६ ।

९४. ऐसी कृपावंत कोण । माझे विठाईवांचोन । १ ।
ऐसा कोण आहेरवासा । पदी बसवीं आपल्या दासा । २ ।

ऐसा कोण सरदार । छत्र धरी दासावर। ३ ।
ऐसा कोण आहे धनी । दासी जनी घाली वेणी। ४ ।

९५. प्रात: काळी उठोनि पाहे । वाकळात निजला आहे । १ ।
काय वाकळाची गोडी । निद्रा लागली, बा, वेडी। २ ।
उगवला दिनकर । घरी लपलाहे चोर । ३ ।
मुख उघडुनि पाहे । शंख, चक्र दिसताहे । ४ ।
वेड लागलें मुकुंदा । दासी जनी सोडी धंदा । ५ ।

९६. तुळशीचे वनीं । जनी उकलीत वेणी। १ ।
हातीं घेऊनियां लोणी । डोई चोळी चक्रपाणि । २ ।
माझे जनीला नाहीं कोणी । म्हणुनी देव घाली पाणी । ३ ।
जनी सांगे सर्व लोकां । न्हाऊं घाली माझा सखा । ४ ।

९७. साळी सडायास काढी । चक्रपाणि उखळ झाडी । १ ।
कांडितां कांडितां । शीण आला पंढरिनाथा । २ ।
सर्व अंगीं घाम आला । तेणें पितांबर भिजला । ३ ।
पायीं पैंजण हातीं कडीं । कोंडा पांखडुनि काढी। ४ ।
हाता आला असे फोड । जनी म्हणे मुसळ सोड । ५ ।

९८. एके दिवशीं वाडियांत । देव आले अवचित । १ ।
अवघीं पायांस लागली । देवें त्यांवरी कृपा केली । २ ।
बाहेर कामासी गुंतल्यें । देवें मजला विचारिलें । ३ ।
बाहेर आहेस वो बोलती । देव मजला हाटकिती । ४ ।
हात धुऊनि जवळ गेल्यें । कोण गे जनी हांसून बोले । ५ ।

९९. दळण्याच्या मिषें । विठ्ठल सावकाशें। १ ।
देहबुद्धीचें वैरण । द्वैत खडा रे निसून। २ ।

एकलीच गातां । दुजा साद उमटतां । ३ ।
कोण गे तुझे बरोबरी । साद देतो निरंतरी । ४ ।
खूण कळली नामदेवा । विठ्ठल श्रोता जनीच्या भावा । ५ ।

१००. मग हांसोनि सकळी । पाहू देव कैसा बळी । १ ।
आले नामदेवा घरीं । प्रेमें भुललासे हरी । २ ।
घाली जातिया वैरण । गाय आवडीचें गाणे । ३ ।
पुढें देखे ज्ञानेश्वरा । देव झालासे घाबरा । ४ ।
जनी म्हणे पंढरिनाथा । जाय राउळासी आतां । ५ ।

१०१. फिरली माघारी वृत्ती पाहूं गेली । नारायण झाली येकायेकी । १ ।
आतां बोलवेना दाटला हे कंठीं । त्याची पडे मिठी प्रेमलोटे । २ ।
जैसें लवण हें सिंधूसी मिळाले । तैसें मज केलें येकायेकीं । ३ ।
तेणें चैतन्याच्या उघडला डोळा । वैकुंठीं सावळा नारायण । ४ ।
नामयाची जनी मुकुट देवाचे । पांडुरंगजीचें नांव साजे । ५ ।

१०२. निवृत्ति पुसत । कोठें होते पंढरिनाथ । १ ।
खूण कळली हृषिकेशी । सांगों नको निवृत्तीसी । २ ।
उत्तर दिलें ज्ञानदेवें । नवल केवढें सांगावे । ३ ।
शिव वंदी पायवणी । नये योगियांचे ध्यानीं । ४ ।
द्वारीं उभे ब्रह्मादिक । गुण गाती सकळीक । ५ ।
जनीसवें दळी देव । तिचा देखोनियां भाव । ६ ।

१०३. काकड आरती । करावया कमळापती । १ ।
भक्त मिळाले सकळ । रितें देखिलें देउळ । २ ।
ज्ञानेश्वर बोले । आतां देव कोठें गेले । ३ ।
ठावें जाहलें अंतरीं । देव दळी जनी घरीं । ४ ।

१०४. जाय जाय राउळासी। नको येऊं आम्हांपाशीं। १ ।
जाऊं आम्ही बरोबर। झाला तिचा हो चाकर। २ ।
तिजसंगें काम करी। ऐसा जाणा देव हरी। ३ ।
चहूं हातीं धुणें केलें। जनी म्हणें बरें झालें। ४ ।

१०५. आतां पुरे हा संसार। कोठें फेडूं उपकार। १ ।
सांडूनियां थोरपण। करी दळण कांडण। २ ।
नारीरूप होउनी हरी। माझें न्हाणें धुणें करी। ३ ।
राना जाये वेंची शेणी। शेखीं वाहे घरीं पाणी। ४ ।
ठाव पायापाशीं। म्हणे नामयाची दासी। ५ ।

१०६. धुणें घेऊनि कांखेसी। जनी गेली उपवासी। १ ।
मागें विठ्ठल धांवला। म्हणे कां टाकिलें मला। २ ।
कां गा धांवोनि आलासी। जाय जाय राउळासी। ३ ।
चहूं हातें धुणें केलें। जनी म्हणे बरें झालें। ४ ।

१०७. जनी जाय शेणासाठीं। उभा आहे तिच्या पाठीं। १ ।
पितांबराची कांस खोवी। मागें चाले जनाबाई। २ ।
गौऱ्या वेंचूनि बांधिली मोट। जनी म्हणे द्यावी गांठ। ३ ।
मोट उचलून डोई घेई। मागें चाले जनाबाई। ४ ।

१०८. राना गेली शेणीसाठी। वेंचूं लागे विठो पाठी। १ ।
पितांबर ओचे खोंवी। पायीं शोभा पारखावी। २ ।
रिती बांधितांचि मोट। जनी म्हणे द्यावी भेट। ३ ।

१०९. जनीचिया बोलें करी नित्य काम। वसवी तिचें धाम लक्ष्मीसी। १ ।
जनीचिया गोष्टी प्रेम ज्याचे मनीं। तयाचे चरणीं ओढवी माथा। २ ।
महेशादिदेव तेहि तया ध्याती। जे आवडे गाती जनी ध्याती। ३ ।

११०. आई मेली बाप मेला। मज सांभाळीं विठ्ठला। १ ।
हरी रे मज कोणी नाहीं। माझी खात असे डोई । २ ।
विठ्ठल म्हणे रुक्मिणी। माझे जनीला नाहीं कोणी। ३ ।
हातीं घेउनी तेलफणी । कैंस विंचरून घाली वेणी। ४ ।
वेणी घालुन दिधली गांठ। जनी म्हणे चोळ बा पाठ। ५ ।
जनी म्हणे बा गोपाळा। करी दुबळीचा सोहळा। ६ ।

१११. एक प्रहर रात्र झाली। फेरी विठ्ठलाची आली। १ ।
नामा म्हणे जनी पाहे। द्वारीं उभा कोण आहे। २ ।
प्रभा घरांत दाटली । एक सराद सुटली । ३ ।
एकमेकां आलिंगन । नामा म्हणे जनी धन्य। ४ ।

११२. जनी जाय पाणीयासी। मागें धांवे हृषिकेशी। १ ।
पाय भिजों नेदी हात । माथां घागरी वहात। २ ।
पाणी रांजणांत भरी। सडासारवण करी। ३ ।
धुणें धुऊनियां आणी। म्हणे नामयाची जनी। ४ ।

११३. पदक काय गेलें निशाणाचें। परी हीनत्व प्रभूचें। १ ।
तया रणा येणें लागे। काय सर, वो माझे । २ ।
करी आलीस तत्त्वतां । कोण मानी त्याची सत्ता । ३ ।
जनी म्हणे हृषीकेशी। तैसा, देवा, तूं नव्हेसी। ४ ।

११४. एके रात्रींचे समयीं। देव आले लवलाहीं। १ ।
सुखशेजे पहुडले। जनीसवें गुज बोले । २ ।
गुज बोलतां बोलतां । निद्रा आली अवचिता। ३ ।
उठा उठा चक्रपाणि। उजाडलें म्हणे जनी। ४ ।

११५. पदक माळा सकलाद। तेथें टाकिली गोविंदें। १ ।
देव तांतडी निघाले । वाकळ घेउनी पळाले । २ ।

भक्त येती महाद्वारीं । चोर पडले देव्हारीं। ३ ।
नवल झालें पंढरपुरीं । देव राबे दासी घरीं । ४ ।
त्रिभुवनांत मात गेली । दासी जनी प्रगटली। ५ ।

११६. पदक विठ्ठलाचें गेलें। ब्राह्मण म्हणती जनीनें नेलें । १ ।
अगे शिंपियाचे जनी। नेलें पदक दे आणुनी। २ ।
देवासमोर तुझें घर। तुझें येणें निरंतर। ३ ।
म्यां नेलें नाहीं जाण । सख्या विठोबाची आण। ४ ।
वाकळ झाडुनि पाहती । पडलें पदक घेऊनि जाती। ५ ।
जनी वरी आली चोरी । ब्राह्मण करिती मारा मारी । ६ ।
धाविन्नले चाळीस गडी । जनीवरी पडली उडी। ७ ।
दंडीं लाविल्या काढण्या । विठो धांवरे धावण्या । ८ ।
चंद्रभागे रोविला शूळ । जनाबाईस आलें मूळ। ९ ।
हातीं टाळी वाजविती। मुखीं विठ्ठल बोलती । १० ।
विलंब लागला ते वेळीं । म्हणती जनिला द्यारे सुळीं। ११ ।
ऐसा येळकोट केला । जनी म्हणे विठो मेला । १२ ।
तंव सुळाचें झालें पाणी। धन्य म्हणे दासी जनी । १३ ।

११७. अरे विठ्या विठ्या । मूळ मायेच्या कारट्या। १ ।
तुझी रांड रंडकी झाली। जन्मसावित्री चुडा ल्याली। २ ।
तुझें गेलें मढें । तुला पाहून काळ रडे। ३ ।
उभी राहूनि आंगणी। शिव्या देत दासी जनी। ४ ।

११८. आम्ही सिंदळी वो बाई। पतिव्रता व्रत डोई। १ ।
आमचे पाल भीवरेत । विठू आमचे मंदिरांत। २ ।
करूं साधु संता व्यापार। हरिनामाचा बाजार । ३ ।
जनी म्हणे परद्वार केले। जन्ममरण चुकविले। ४ ।

## श्रीनामदेव चरित्र

११९. धन्य ते पंढरी धन्य पंढरिनाथ। तेणें हो पतीत उद्धरिले। १।
धन्य नामदेव धन्य पंढरिनाथ। तयानें अनाथ उद्धरिले। २।
धन्य ज्ञानेश्वर धन्य त्याचा भाव। त्याचे पाय देव आम्हां भेटी। ३।
नामयाची जनी पालट पैं झाला। भेटावया आला पांडुरंग। ४।

१२०. देहाचा पालट विठोबाचे भेटी। जळ लवणा गांठीं पडोन ठेली। १।
धन्य मायबाप नामदेव माझा। तेणें पंढरीराजा दाखविलें। २।
रात्रंदिवस भाव विठ्ठलाचे पायीं। चित्त ठायींचे ठायीं मावळलें। ३।
नामयाचे जनी आनंद पैं झाला। भेटावया आला पांडुरंग। ४।

१२१. राजाई गोणाई। अखंडित तुझे पायीं। १।
मज ठेवियलें द्वारीं। नीच म्हणोनि बाहेरी। २।
नारा गोंदा महादा विठा। ठेवियलें अग्रवाटा। ३।
देवा केव्हां क्षेम देसी। आपुली म्हणोनी जनी दासी। ४।

१२२. माझ्या नामयाची दोरी। तुझ्या हातामधे आहे।
क्षेम देवोनिया राहे। केशिराजा। १।
माझ्या नामयाचा भाव। भक्तिप्रेमात नाहला।
रंक धनवंत झाला। पांडुरंगे। २।
माझ्या नामयाची गाणी। तुझे आहे महिमान।
ऐक तुझा तू सन्मान। हृषिकेशी। ३।
माझ्या नामयाचे ऋण। कसे फेडशील देवा।
करी पुंडलिक हेवा। वाळुवंटी। ४।
माझ्या नामयाची निंदा। तुझी तीच रे नालस्ती।
मग होईल मध्यस्ती। दासी जनी। ५।

१२३. नामदेवाचे घरीं । चौदाजण स्मरती हरी । १ ।
चौघेपुत्र चौंघी सुना । नित्य स्मरती नारायणा । २ ।
आणिक मायबाप पाही । नामदेव राजाबाई । ३ ।
आऊबाई लेकी लिंबाबाई बहिणी । पंधरावी ती दासी जनी । ४ ।

१२४. पुंडलिकापाशीं । नामा उभा कीर्तनासी । १ ।
येऊनियां पांडुरंग । स्वयें टाळ धरी अंगें । २ ।
गाऊं लागे बरोबरी । नाहीं बोलायाची उरी । ३ ।
स्वर देवाचा उमटला । दासी जनीनें ओळखिला । ४ ।

१२५. हाटीं जायाचि तांतडी । नामा होता पैल थडी । १ ।
म्हणे जा गे आणा त्यासी । नाहीं तरी मी उपवासी । २ ।
जनी धांवत चालली । मागें विठ्ठल माउली । ३ ।

१२६. ज्योति भरली की जी । आतां नाहीं दुजा भाव । १ ।
मन ठकासी ठकिलें । कृष्ण अक्षसनें लिहिलें । २ ।
झाला सर्वांगाचा डोळा । हरी नामाची ही लीला । ३ ।
मज एकांतासी नेलें । पुन्हां नाहीं वो, आणिलें । ४ ।
जनी नामयाची दासी । पांडुरंग भीवरेसी । ५ ।

१२७. शेट्या झाला हरी । द्रव्य गोणी लोटी द्वारीं । १ ।
बुद्धि सांगे राजाईसी । तुम्ही न छळावें नामयासी । २ ।
अवघ्या वित्तासी वेंचावें । सरल्या मजपासीं मागावें । ३ ।
विठ्ठलशेट नाम माझें । नामयाला सांगा वोजे । ४ ।
आतां उचित दासासी । ऐसें बोले राजाईसी । ५ ।
ऐसे बोलोनियां गेला । म्हणे जनी नामा आला । ६ ।

१२८. भक्ती मुक्तीचा कौल दिधला । जन्म-मरणाचा धाक तुटला । १ ।
विठ्ठल नामाचें मांडुनिया केणें । न संग ने घे त्यासि अपार उणें । २ ।

रामनामाची मुद्रा दिधली। भक्तिभावें कैसी शाश्वत केली। ३ ।
नामयाची जनी पेचेसी आली । केणे भरीती जाली विटेवरी। ४ ।

१२९. गोणाई राजाई दोघी सासू सुना । दामा नामा जाणा बापलेंक। १ ।
नारा विठा गोंदा महादा चवघे पुत्र। जन्मले पवित्र त्याचे वंशीं । २ ।
लाडाई गोडाई येसाई साखराई । चवघी सुना पाहीं नामयाच्या। ३ ।
लिंबाई ती लेकी आऊबाई बहिणी । वेडीपिशी जनी नामयाची । ४ ।

१३०. सुंबाचा करदोडा रकट्याची लंगोटी । नामा वाळवंटी कथा करी। १ ।
ब्रह्मादिक देव येवोनि पहाती। आनंदे गर्जती जयजयकार। २ ।
जनी म्हणे त्याचे काय वर्णू सुख। पहाती जे मुख विठोबाचें । ३ ।

१३१. मागें संत झाले। नामया ऐसें कोण बोले । १ ।
नामा जाता राउळासी । देव बोले आधी त्यासी । २ ।
केवढें नवल सांगावे । दासी जनीचे पद लिहावें । ३ ।

१३२. पूर आला पंढरीसी । पाणी लागे पायरीसी । १ ।
संतजन हो मिळाले । उठुनी नामयाजवळी गेले । २ ।
नामा सांगे विठोबासी । उतार द्यावा भिवरेसी। ३ ।
दीनवत्सल महाराज। जनी म्हणे केले काज। ४ ।

१३३. मी गा पातकाची राशी। तुमची पुण्याची मिराशी। १ ।
द्यावा परता नामदेव । ठेवा जवळी त्याचा भाव। २ ।
नष्ट पै चांडाळीण मी। तुम्ही सहस्रनामी, अनामी । ३ ।
माझी वाणी शिवराळ। तुम्ही अंतर्बाह्य रसाळ। ४ ।
मज कळले नाही मर्म। दया, क्षमा तुमचा धर्म। ५ ।
आता अंत नका पाहू । नामावाचून कैशी राहू। ६ ।
झेंडा खांद्यावर मिरवीन। घरी नामया नेईन। ७ ।
माझा श्वास नामाठायी। जनी पडते देवा पायी। ८ ।

१३४. वोढिला ताडिला । देव भक्तिनें फाडिला । १ ।
एका प्रेमा नामासाठिं। भक्ति कोंडियला कंठी। २ ।
झाला नामयाचा मजूर । मोळ्या बांधाटयाचा थर । ३ ।
भिंती चांदया रचिले । त्याचे छप्पर शेकारीले । ४ ।
वरी सोडुनियां पाणी। धन्य भक्त म्हणे जनी । ५ ।

१३५. वारा पाणी मुसळ धारा। तेणें मोडिलें छपरा। १ ।
मग विठाई धांवली । हातीं चक्र धांवत आली। २ ।
वासे लाविले चौफेर । क्षणामध्यें केलें घर । ३ ।
जागा झाला नामदेव । द्वारीं उभे पंढरीराव। ४ ।
डोयी ठेवून पायांवरी। दासी जनी चरण चुरी। ५ ।

१३६. ज्ञानेश्वर म्हणे नामयासवें जेविसी । नाही हृषिकेशी ह्मणतसे । १ ।
सांगितलें एक भलतेंचि बोलसी । आहे याची भ्रांति ज्ञानेश्वरा। २ ।
वाहीयेलें त्वरें ऐसें कांही काम। उठे मेघशाम तातडीनें । ३ ।
निरोप येवोनि सांगावा एकांती । म्हणे जनीप्रति पांडुरंग। ४ ।
देव म्हणे नामया ऐकावें वचन । येईल साधोन वेळ तुझी। ५ ।
जनी म्हणे आतां समजलें मज। धरीन उमज येथोनियां। ६ ।

१३७. आषाढी एकादशी । नामा होता उपवासी। १ ।
देवें गरुड धाडिला। वेगीं बोलाविलें त्याला। २ ।
राही म्हणे पांडुरंगा। कोणें बोलाविलें सांगा। ३ ।
माझ्या जिवीचे जीवन । त्याला बोलाविले जाण । ४ ।
ऐसा भक्तराज निका। दासी जनीचा आत्मसखा। ५ ।

१३८. नामा येऊनियां पाहे। आजि कौतुक दिसताहे । १ ।
तंव निवेदी राजाई। लागे नामयाचे पायीं। २ ।

नामा म्हणे या द्रव्यासी। आम्ही नातळों मानसीं। ३ ।
वेगीं बोलवा ब्राह्मण। करु आतां संतर्पण। ४ ।
हातीं टाळ दिंडीगान। हेंचि आमुचे सर्व धन। ५ ।
ऐसें आश्वर्य देखोनी। जनी हांसतसे मनी। ६ ।

१३९. उभा माझा हरी देखियला डोळां। सुकुमार सांवळा भेटियेला। १ ।
सुखाचें अंतर रंगलें हें चित्त। सदा हरि पाहात नारायण। २ ।
कृपादृष्टी केली चारी भुजा माते। शंखचक्र हात दोन्ही माझे। ३ ।
मागें पुढें उभा मीचि नारायण। हातीं सुदर्शन पाहियेला। ४ ।
जनीचिये भेटीमाजीं निरंतर। सदा कृपादृष्टी भक्तांवरी। ५ ।

१४०. करुनी आरती। नामा आला घराप्रती। १ ।
तेणें धरियेले व्रता। अन्न न घ्यावें सर्वथा। २ ।
ऐसा जाणोनिया नेम। अनुभवी पुरुषोत्तम। ३ ।
आषाढी एकादशी। विप्रवेषें हृषिकेशी। ४ ।
आला नामयाचे सदनी। नाम गाय दासी जनी। ५ ।

१४१. नमुनी ब्राह्मण। म्हणे मज द्यावें अन्न। १ ।
नामा म्हणे एकादशी। ईच्छित द्यावे फळारासी। २ ।
अन्नावांचोनी आतां। मज नको रे सर्वथा। ३ ।
हातापायांची बेगडी। विप्रें घातली मुरकुंडी। ४ ।
जीव सोडी चक्रपाणि। म्हणे नामयाची जनी। ५ ।

१४२. जनसमुदाय मिळाला। थि:कारिती नामयाला। १ ।
विप्र बोलावुनी वेगें। प्रेत नेलें चंद्रभागे। २ ।
मोठे रचुनी सरण। मध्यें निजविला ब्राह्मण। ३ ।
नामा शय्या पहूडला। म्हणे अग्नि द्या आम्हाला। ४ ।

अग्नि दिला जयाप्रती । देव विमानी पाहती । ५ ।
विस्मित झाला चक्रपाणि । प्रगट होय म्हणे जनी । ६ ।

१४३. अग्नी लागतां अंगासी । घाबरला हृषिकेशी । १ ।
निजरुपे प्रगटला । चरणी मस्तक ठेविला । २ ।
सोनसळा वैजयंती । कोटि सूर्य ते लोपती । ३ ।
नामा म्हणे विठोबाला । भला अंत रे पाहिला । ४ ।
हाती धरुनी नामयासी । पाठ थापटी हृषिकेशी । ५ ।
गेला राउळीं चक्रपाणि । भावे वंदी दासी जनी । ६ ।

१४४. धन्य माझा जन्म धन्य माझा वंश । धन्य विष्णुदास स्वामी माझा । १ ।
कामधाम माझे केशवाचे पायी । दिननिशी पाहे हारपली । २ ।
शुक सनकादिक जेणें सुखें धाले । ते सुख राहिले माझ्या मनीं । ३ ।
जनी म्हणे जगी अलभ्य लाभ झाला । हरी सापडला विटेवरी । ४ ।

१४५. नोवरीया संगे वऱ्हाडीया सोहोळा । मांडे पुरणपोळ्या मिळे अन्न । १ ।
परीसाचेनीसंगे लोहो होय सोनें । तयाची भूषणें श्रीमंतासी । २ ।
जनी म्हणे जोड झाली विठोबाची । दासी नामयाची म्हणोनिंया । ३ ।

१४६. ऐका हो नामयाचा जन्म मूळसंचित । धृ० ।
हिरण्यकश्यपकुळी नामा प्ऱ्हाद । पद्मीनी नाम माझे श्रेष्ठ दासीचें पद । १ ।
दुसरा जन्म याचा अंगज रामभक्त । मंथरा नाम माझें भरतें मारिली लात । २ ।
द्वापारीं कृष्णसेवा उद्धव जन्मला । कुबज्या नाम माझें देवें उद्धार केला । ३ ।
कलीत नामदेव विठ्ठल चिंतनी । त्याचीच सेवेलागी दासी जन्मली जनी । ४ ।

१४७. एकच टाळी झाली चंद्रभागे वाळवंटी । माझा ज्ञानराज गोपाळासी लाह्या वाटी । १ ।
नामदेव कीर्तन करी पुढे नाचे पांडुरंग । जनी म्हणे बोला ज्ञानदेवा अभंग । २ ।
अभंग बोलता रंग कीर्तनीं भरिला । प्रेमाचेनि छंदें विठ्ठल नाचूं लागला । ३ ।

साधु या संतांनी देवाला धरिला मनगटीं। काय झालें म्हणुनि दचकले जगजेठी। ४ ।
ऐसा कीर्तन महिमा सर्वांमाजी वरिष्ठ। जडमूढ भाविका सोपी केली पायवाट। ५ ।
नामयाची जनी लोळे संताच्या पायी। कीर्तन प्रेमरस अखंड देई गे विठाई। ६ ।

## तीर्थावळीचे अभंग

१४८. जावोनी राउळा जोडूनिया हात । बोले ज्ञानेश्वर विठोबासी। १ ।
करावी ही तीर्थे आवड अंतरी। घ्यावे बरोबरी नामदेवा। २ ।
ऐकताचि ऐसें म्हणे पांडुरंग। न धाडितां राग येईल तुज। ३ ।
तयाविण मज घडी जरी जाय। युगा ऐसी होय ज्ञानेश्वरा। ४ ।
जनी म्हणे मग नामया पाचारी। कृपाळुवा हरि मायबाप। ५ ।

१४९. जाय बरोबरी नामया तूं जाय। न चले उपाय कांहीं येथें। १ ।
करूं काय मज पडिलें सांकडे। उल्लंघेना भीड मज याची। २ ।
नामा म्हणे ऐका स्वामी नारायणा। एक विज्ञापना परिसावी। ३ ।
कटावरी कर नाही ज्या देवांचे। न घे मी तयाचें दरूशन। ४ ।
मारिताची हांक यावे त्वां झडकरी। बरे म्हणे हरि नामयासी। ५ ।
निवृत्ति ज्ञानेश्वर सोपान चांगया। जनी म्हणे तया सांगतसे। ६ ।

१५०. तुम्ही सकळिक संत आहात सज्ञान। हें माझे अज्ञान फार आहे। १ ।
याजबरोबर चालावी हो वाट। मोडतील कांटे सांभाळावे। २ ।
हळुहळु जावे करु नका घाई। चालायाची नाही सवय यासी। ३ ।
लागतांचि भुक न घरी हा निर्धार। घ्यावा समाचार क्षणाक्षणा। ४ ।
जनी म्हणे ऐसें बोलिला घननीळ। नेत्रीहूनी जळ वाहतसे। ५ ।

१५१. वियोग नामयाचा न साहे गोपाळा। न जाय राउळा पांडुरंग। १ ।
पद्माळ्यात तेव्हा राहे विश्वंभर। कळे समाचार रुक्मिणीसी। २ ।
चलावें मंदिरी स्वामी पुरुषोत्तमा। येईल गे नामा माझा जेव्हां। ३ ।

तयाविण मज दाही दिशा ओस। न लगे चित्तास गोड काही। ४ ।
जनी म्हणे ऐसी आवॆड नामयाची। म्हणोनियां त्याची झालें दासी। ५ ।

## ❀ संत ज्ञानेश्वर स्तुती ❀

१५२. भाव अक्षरांची गांठी। ब्रह्मज्ञानाने गोमटी। १ ।
ते हे माय ज्ञानेश्वरी। संत जनां माहेश्वरी। २ ।
ज्ञानेश्वर मंगळमुनी। सेवा करी दासी जनी। ३ ।

१५३. गीतेवरी आन टीका। त्यांनी वाढियेली लोकां। १ ।
रानताटामार्जी। त्याने वोगरिली कांजीं। २ ।
या ज्ञानेशा वांचोनि। म्हणे नामयाची जनी। ३ ।

१५४. अळंकापुरवासिनी बैसे माझे मनी। सन्मुख इंद्रायणी वाहातसे। १ ।
ज्ञानाबाई आई आर्त तुझे पायी। धावोनियां येई दुडदुडा। २ ।
बहु कासाविस होतो माझा जीव। कनवाळ्याची कीव येऊ द्यावी। ३ ।
नामयाची जनी म्हणावी आपुली। पायी सांभाळिली मायबापें। ४ ।

१५५. अहो सखीये साजणी। ज्ञानाबाई वो हरणी। १ ।
मज पाडसाची माय। भक्ती वत्साची ते गाय। २ ।
कांगा उशीर लाविला। तुजविण शीण झाला। ३ ।
अहो बैसलें दळणीं। धांव घालीं म्हणे जनी। ४ ।

१५६. विवेक सागर। सखा माझा ज्ञानेश्वर। १ ।
मरोनियां जावें। बा माझ्याच्या पोटा यावें। २ ।
ऐसें करी माझ्या भावा। सख्या माझ्या ज्ञानदेवा। ३ ।
जावें वोवाळुनी। जन्मोजन्मी म्हणे जनी। ४ ।

१५७. मायेहुनि माय मानी। करी जिवाची ओंवाळणी। १ ।
परलोकींचें तारूं। म्हणे माझा ज्ञानेश्वरू। २ ।

वित्त गोत चित्त पाहे। सत्य वंदी गुरूचे पाय। ३ ।
पतिव्रते जैसा पती। जनी म्हणे सांगों किती। ४ ।

१५८. संत राउळा चालिले। ज्ञानेश्वर तंव बोले। १ ।
एवढें नवल सांगावें। दासी जनीचें पद ल्याहावें। २ ।
पाय जोडुनी विटेवरी। कटीं हात उभा हरी। ३ ।
रूप सांवळें सुंदर। कानीं कुंडले मनोहर। ४ ।
सोनसळा वैजयंती। पुढें गोपाळ नाचती। ५ ।
गरूडपारीं सन्मुख उभा। जनी म्हणे धन्य शोभा। ६ ।

१५९. ज्ञानेश्वर अभंग बोलिले ज्या शब्दां। चिदानंद बाबा लिही त्यांस। १ ।
निवृत्तीचे बोल लिहिले सोपानें। मुक्ताईचीं वचनें ज्ञानदेवें। २ ।
चांगयाचा लिहिणार शामा तो कांसार। परमानंद खेचर लिहित होता। ३ ।
सांगे पूर्णानंद लिही परमानंद। भगवंत भेटी आनंद रामानंद। ४ ।
सांवत्या माळ्याचा काशिबा गुरव। कूर्म्याचा वसुदेव काईत होता। ५ ।
चोखामेळ्याचा अनंतभट्ट अभ्यंग। म्हणोनी नामयाचे जनीचा पांडुरंग। ६ ।

१६०. सदाशिवाचा अवतार। स्वामी निवृत्ति दातार। १ ।
महाविष्णूचा अवतार। सखा माझा ज्ञानेश्वर। २ ।
ब्रह्मा सोपान तो झाला। भक्तां आनंद वर्तला। ३ ।
आदि शक्ति मुक्ताबाई। दासी जनी लागे पायीं। ४ ।

१६१. सोपानाची ऐसी मूर्ति। विश्वकर्ता ब्रह्मा म्हणती। १ ।
ऐसें बोले पुराणांत। सृष्टिकर्ता जो भगवंत। २ ।
जनी म्हणे हा सोपान। ब्रह्मा अवतरला पूर्ण। ३ ।

१६२. नामयाचा गुरू। तो हा सोपान सद्गुरु। १ ।
कऱ्हेतिरी करुनी वस्ती। ब्रह्मपुरी तिशी म्हणती। २ ।

माझ्या जिवींच्या जीवना। हृदयी राहें तू सोपाना। ३ ।
चित्त उद्धव ज्याची सत्ता। जनी म्हणे माझ्या ताता। ४ ।

१६३. वाचे म्हणता सोपान। प्राप्त वैकुंठचि जाण। १ ।
सोपानदेव करितां जप। समूळ नाशे त्रिविधताप। २ ।
सोपानदेव धरिता ध्याने। पुन: जन्मा नाही येणें। ३ ।
दासी जनी तल्लिन झाली। सोपान चरणी विनटली। ४ ।

१६४. जनीने बोलिले तैसेच लिहिले। साग्र परिसिले तुम्ही संती। १ ।
अहो ज्ञानदेवा असावे तुम्हा ठावे। येणे काय लहाणीव आणिली आम्हां। २ ।
माझी मज आण सांगते प्रमाण। सेवितें चरण तुझे स्वामी। ३ ।
जनीचे हो बोल स्वानंदाचे डोल। स्वामीमुखी बोल दुणावती। ४ ।
शुद्ध सत्व कागद नित्य करी शाई। अखंडित लिही जनीपाशी। ५ ।
हांसोनि ज्ञानदेवे पिटियेली टाळी। जयजयकार सकळी केला थोर। ६ ।

१६५. पंढरीच्या राया। ज्ञान देई नाम गाया। १ ।
मी तो मूढ तुझी दासी। ठाव दे, गा, चरणांपासी। २ ।
तुझे पदरीं पडले खरी। माझा सांभाळ करी, हरी। ३ ।
लक्ष लाविलें चरणीं। म्हणे नामयाची जनी। ४ ।

१६६. आनंदाचा निधी दाखविला मज। तेणें चतुर्भुज मन माझें। १ ।
नामयाचे घरीं जन्म जाला। जन्मांतरींचा ठेवा विठो देखिला। २ ।
संत सनकादिक ज्या सुखें धाले। तें सुख माझ्या हृदयीं राहिले। ३ ।
साऱ्या चराचरा कळलें नाहीं। तें माझ्या हृदयीं बिंबलेसें। ४ ।
नामयाचे जनीस जाहलें सुख। देखतां पै मुख विठोबाचें। ५ ।

१६७. जनीचे बोलणे वाची नित्य कोणी। तयाचे आंगणी तिष्ठतसे। १ ।
जनीचिया पदां अखंडित गाये। तयाचे मी पाये वंदी माथां। २ ।

जनीचे आवडे जयासी वचन। तयासी नारायण कृपा करी। ३ ।
पांडुरंग म्हणे ऐक ज्ञानदेवा। ऐसा वर द्यावा जनींसाठी। ४ ।

## संत सेना महाराज कथा

१६८. सेना न्हावी भक्त भला। तेणें देव भुलविला। १ ।
नित्य जपे नामावळी। लावी विठ्ठलाची टाळी। २ ।
रूप पालटोनि गेला। सेना न्हावी विठ्ठल झाला। ३ ।
काखें घेउनी धोकटी। गेला राजियाचे भेटी। ४ ।
आपुले हातें भार घाली। राजियाची सेवा केली। ५ ।
विसर तो पडला रामा। काय करूं मेघ:शामा। ६ ।
राजा अयनियांत पाहे। चतुर्भुज उभा राहे। ७ ।
दूत धाडूनियां नेला। राजियानें बोलाविला। ८ ।
राजा बोले प्रीतीकर। रात्रीं सेवा केली फार। ९ ।
राजसदनाप्रति न्यावें। भीतरींच घेउनी जावें। १०।
आतां बरा विचार नाहीं। सेना म्हणे करूं काई। ११।
सेना न्हावी गौरविला। राजियानें मान दिला। १२।
कितीकांचा शीण गेला। जनी म्हणे न्हावी झाला। १३।

१६९. ऐसी कीर्तनाची गोडी। वैकुंठींहुनी घाली उडी। १ ।
आपण वैकुंठींच नसे। भक्तापासीं जाण वसे। २ ।
जनी म्हणे कृपानिधी। भक्तभावाची मांदी शोधी। ३ ।

१७०. विठोबा चला मंदिरांत। गस्त हिंडती बाजारांत। १ ।
रांगोळी घातली गुलालाची। शेज म्यां केली पुष्पांची। २ ।
समया जळती अर्ध रात्रीं। गळ्यांमध्यें माळ मोत्यांची। ३ ।
नामदेवाला सांपडलें माणिक। घेतलें जनीनें हातांत। ४ ।
जनी घेउनी गेली राउळांत। गस्त हिंडती हकिमाची बाजारांत। ५ ।

१७१. विठ्ठलाचा छंद । वाचे गोविंद गोविंद । १ ।
हाचि बोला हो सिद्धांत। देव सांगे हो धादांत । २ ।
जनी म्हणे सांगेन आतां । कृपें ऐका पंढरीनाथा । ३ ।

१७२. जिव्हा लागली नामस्मरणीं । रित्या मापें भरी गोणी । १ ।
नित्य नेमाची लाखोली। गुरु आज्ञेनें मी पाळीं । २ ।
मज भरंवसा नामाचा । गजर नामयाच्या दासीचा। ३ ।
विटेवरी ब्रह्म दिसे। जनी त्याला पाहतसे। ४ ।

१७३. सोंगा सोंगा जाये। नवल जाउनी हांसताहे । १ ।
हांसोनियां बडवी टिरी । कोण नाठवी हे परी । २ ।
हा नाठवी आपणा। म्हणे जनी भुललें जाणा। ३ ।

१७४. देहभाव सर्व जाय । तेव्हां विदेही सुख होय। १ ।
तया निद्रें जे पहुडले । भवजागृति नाहीं आले। २ ।
ऐसी विश्रांती लाधली। आनंदकळा संचरली । ३ ।
त्या एकीं एक होतां। दासी जनी कैंचि आतां । ४ ।

१७५. प्रेमभावें तुम्ही नाचा । रामरंगें रंगो वाचा । १ ।
हेंचि मागों देवाजीला । आवडी शांती खरें बोला। २ ।
जैसी माय तान्हयातें । खेळउनी चुंबी त्यातें। ३ ।
तैंवि तुम्ही संतजना। सर्वा धरावी भावना । ४ ।
हरि कोठवळा झाला। म्हणे जनी भक्तीं केला । ५ ।

१७६. अर्थ जे काढिती उपनिषदांमाजी । सांडोनियां गोड भाजी घेती माठ। १ ।
भूगोलाचा स्वामी सुप्रसन्न झाला । त्यासी मागे पाला भाजीचा तो । २ ।
पुंडलिकें धन जोडिलें असतां । प्रार्थोनियां देतां न घेती हे। ३ ।
मग गडी हो पाहे देवचि येथोनि। जवळी होती जनी फावलें तिये। ४ ।

१७७. वेदांती हें बोलिले। सिद्धांती हें नेमियेले। १ ।
लागा लागा भक्तिवाटा। धरा हेंचि नेमनिष्ठा। २ ।
वेदबाह्य तें कर्म। सांडीं न करीं अधर्म। ३ ।
तोचि एक होय ज्ञानी। देवनिष्ठ म्हणे जनी। ४ ।

## मागणें

१७८. ऐसा वर देई हरी। गाई नाम निरंतरीं। १ ।
पुरवीं आस माझी देवा। जेणें घडे तुझी सेवा। २ ।
हेंचि आहे माझे मनीं। कृपा करीं चक्रपाणि। ३ ।
रूप न्याहाळुनियां डोळां। मुखीं नाम लागो चाळा। ४ ।
उदाराच्या राया। दासी जनी लागे पायां। ५ ।

१७९. साधु आणि संत। जन्म द्यावा जी कलींत। १ ।
मागणें तें हेचि देवा। कृपा करीं हो केशवा। २ ।
संत दयाळ परम। तया साक्षी आत्माराम। ३ ।
जनी म्हणे ऐसे साधु। तयापाशीं तूं गोविंदु। ४ ।

१८०. विटेवरी ब्रह्म दिसे। जनी त्याला पाहातसे। १ ।
देव भावाचा अंकित। जाणे दासाचे तें चित्त। २ ।
जनी मागे भक्ति देवा। तिचा मनोरथ पुरवा। ३ ।

१८१. देवा देंई गर्भवास। तरीच पुरेल माझी आस। १ ।
परि हे देखा रे पंढरी। सेवा नामयाचे द्वारीं। २ ।
करी पक्षि कां शुकर। श्वान श्वापद मार्जार। ३ ।
ऐसी आस हे मानसीं। म्हणे नामयाची दासी। ४ ।

१८२. ऐसा पुत्र देंई संतां। तरी त्या आवडी पंढरीनाथा। १ ।
गीता नित्य नेमें। वाची ज्ञानेश्वरी प्रेमें। २ ।

संतांच्या चरणा। करी मस्तक ठेंगणा। ३ ।
कन्या व्हावी भागीरथी। तुझे प्रेम जिचे चित्तीं। ४ ।
ऐसे करी संतजना। दासी जनीच्या निधाना। ५ ।

१८३. माझें दु:ख नाशी देवा। मज सुख दे केशवा। १ ।
आम्हां सुख ऐसें देई। तुझी कृपा विठाबाई। २ ।
चरणीं अनन्य शरण। त्यासि नाहीं जन्म मरण। ३ ।
जनी म्हणे हेंचि मागें। धण्या सर्व तुज सांगें। ४ ।

१८४. रुक्माई आईचें आहे ऐसें भाग्य। असावें आरोग्य चिरकाळ। १ ।
सख्या पुंडलिका आवडतें स्थळ। असावें चिरकाळ स्वस्ति क्षेम। २ ।
अहो संतजन घ्या आवडतें धन। असावें कल्याण चिरकाळ। ३ ।
जन्मोजन्मीं हेंचि मागें गोविंदासी। म्हणे जनी दासी नामयाची। ४ ।

१८५. परधन कामिनी समूल नाणीं मना। नाहीं हे वासना माया केली। १ ।
तृष्णा हे अधम न व्हावी मजला। प्रेमाचा जिव्हाळा देंई तुझ्या। २ ।
निरपेक्ष वासना देगा मज देवा। आणि तुझी सेवा आवडीची। ३ ।
शांतीची भूषणें मिरविती अंगी। वैष्णव आणि योगी म्हणावे ते। ४ ।
असो तो अकुळी असो भलते याती। माथां वंदी प्रीती जनी त्यासी। ५ ।

१८६. द्वारकेच्या राया। बुद्धि दे गा नाम गाया। १ ।
मतिमंद तुझी दासी। ठाव देंई चरणांपासीं। २ ।
तुझे पदरीं पडलें खरी। आतां सांभाळ करीं हरी। ३ ।
न कळे हरीची करणी। म्हणे नामयाची जनी। ४ ।

## संतस्तुति

१८७. संतांचा तो संग नव्हे भलतैसा। पालटावी दशा तात्काळिक। १ ।
चंदनाचे संगे पालटती झाडें। दुर्बळ लांकडें देवामाथां। २ ।

हें कां ऐसें व्हावें संगती स्वभावें। आणिकें न पालटावें देहालागीं। ३ ।
तैसा नि:संगाचा संग अग्रगणी। जनी ध्याय मनीं ज्ञानेश्वरा। ४ ।

१८८. संत हे कोण तरी देवाचे हे डोळे । पूजेविण आंधळे देवाचिये। १ ।
कोण्या नेत्रें देव पाहे तुजकडे । यासाठीं आवडे संत करी। २ ।
संत ऐसे करी देवाचे कान । सांडियेल्या ध्यान कोण ऐके। ३ ।
संत पुससी तरी देवाचे ते पाय । आगमा न गमे सोय मागाडीये। ४ ।
संत पुससी तरी देवाचें ते पाय । धरूनियां सोय दाविती हरी। ५ ।
संत म्हणसी तरी देवाचा हा गळा । जेणें रस आगळा वेदादिकां। ६ ।
संतजरी पुससी तरी देवाचें वदन। माझें तें वचन संत झाले । ७ ।
परादिया चारी सांडूनि मीपणीं। संत बोले वाणी विठोबाची। ८ ।
परेचिया चारी आनंदा माझारीं। संत झाले अंतरीं पडजीभ देवा । ९ ।
क्षर जे नासिलें अक्षर तें काढिलें। नि:शब्दाचें झालें बोले संत। १०।
शब्द तो उडाला नाद तो बुडाला। भेद तो आटला माया भावीं। ११।
विठो वटावरीं पारंबिया झाले । केश ते वाढले माय संत । १२।
कुरळ होऊनियां देती ते सुढाळ। म्हणे जनी वोवाळ जीवेंभावे। १३।

१८९. आंधळ्याची काठी। अडकली कवणें बेटीं। १ ।
माझिये हरणी। गुंतलीस कोणे रानीं । २ ।
मुकें मी पाडस। चुकलें भोवें पाहें वास। ३ ।
तुजवीण काय करूं । प्राण किती कंठीं धरूं। ४ ।
आतां जीव जाऊं पाहे । धांव घालीं माझे माये। ५ ।
माझी भेटवा जननी । संतां विनवी दासी जनी। ६ ।

१९०. आलीया जन्मासी । शरण जावें विठोबासी। १ ।
तेणें सुफळ संसार। हो का नारी अथवा नर। २ ।
व्रत करा एकादशी। नाम कथा अहर्निशीं। ३ ।

होय पापांचें निर्मूळ। वंशीं सुखाचे सोहाळे। ४।
न लगे योग याग तपें। तुम्हां सांगितलें सोपें। ५।
हेचि तुम्हांसी विनंती। म्हणे दासी धरा चित्तीं। ६।

१९१. आले व्रत एकादशी। जनी गेली राउळासी। १।
बुक्का घेऊनिया माळा। पाणी भरोनी भोपळा। २।
येतां दुरोनी देखिली। अवघी घामाघूम झाली। ३।
होईल देवासी विटाळ। जाली फराळाची वेळ। ४।
फुलें - माळा विखुरली। तुंब्याची ते गत जाली। ५।
हहीं प्रेमाचें भरीत। देवा जोडी दोन्ही हात। ६।
नेत्रीं अश्रूंचिया धारा। केला संकल्प सारंगधरा। ७।
जनी बाहेर घातली। थोर गहिवरें दाटली। ८।

१९२. पंढरपूर। जग मुक्तीचें माहेर। ध्रु।
आषाढी मासीं एकादशी। यात्रा दाटे चारी दिवसीं।
शंकर डोलतसे कैलासी। गिरिजावर। १।
भीमा, चंद्रभागा दोन्ही। वाहाती आनंदें करूनी।
यात्रा उतरतसे मधुनी। जळ सुंदर। २।
संत सनकादिक येती। टाळ मृदुंग वाजती।
घोष अमरपुरीं उमटती। बहू गजर। ३।
कांदून वेणुनाद भावें। स्नान पद्माळा करावे।
दर्शन विठोबाचें घ्यावें। उभा विटेवर। ४।
एक वेळ संसारा येउनी। पांडुरंग पहावा नयनी।
जनी ध्यातसे निशिदिनीं। सारंगधर। ५।
जग मुक्तीचें माहेर। पंढरपूर।

१९३. सावळा गोविंद सावळें हें लेणें। सावळ्यानें मन वेडें केलें। १ ।
सावळ्याच्या कानीं सावळी कुंडलें। सावळी पाउलें आलिंगिलीं । २ ।
सावळी कस्तूरी सावळी हे शोभा । सावया का उभा पाहियेला। ३ ।
सावळा तो वेळू सावळी ते गाय। सावळी रखुमाई पाहियेली । ४ ।
जनी म्हणे आतां सावळा भेटून । जावें लिंबलोण केलें आजी। ५ ।
मज सावळ्यानें घातियेली मिठी। आता माझ्या पोटीं, नारायणा। ६ ।
देह माझा देव सावळा गोविंद। उभा, रे गोविंद नारायणा। ७ ।
अंगावरी लोट पूर दाट आला। संत हे लावला नारायण । ८ ।
चैतन्य चेतलें भक्ती मुक्तावली। मुलीची माउली नारायण । ९ ।
जनी नामयाची मूर्ती गोविंदाची। उभी आनंदाची पंढरीत । १०।

१९४. पाहतां पंढरीराया । त्याच्या मुक्ति लागे पायां। १ ।
पुरुषार्थें चारी । त्याचें मोक्ष आर्जव करी । २ ।
धन संपत्तीचा दाता। होय पाहतां पंढरीनाथा। ३ ।
संताचे चरणीं । लोळे नाचे दासी जनी । ४ ।

१९५. विष्णुमुद्रेचा अंकिला। तोचि वैष्णव एक भला। १ ।
अहं जाळोनी अंगारा। सोहंभस्मी तीर्थ सारा । २ ।
विष्णु माया द्वारावती । भक्तिमुद्रा त्या मिरवती। ३ ।
पंचायतन पूजी भावें। अहं सोहं भस्मीं नांवें। ४ ।
प्रेमतुळसी कानीं । म्हणे नामयाची जनी। ५ ।

१९६. वैष्णव तो एक इतर तीं सोंगें। ठसे देउनी अंगें चितारिती। १ ।
जिचे योनि जन्मला तिसी दंडूं लागला । तीर्थरूप केला देशधडी। २ ।
नाइकोनी ब्रह्मज्ञान जो का दुराचारी। अखंड द्वेष करी सज्जनांचा। ३ ।
विद्येच्या अभिमानें नाइकें कीर्तन। पाखांडी हें म्हणे करिती काई। ४ ।
पंचरस पात्रा कांता हे बुडविती। उद्धरलों म्हणती आम्ही संत। ५ ।

ीर्तनाचा द्वेष करी तो चांडाळ । तयाचा विटाळ मातंगीसी । ६ ।
ष्णव तो एक चोखामेळा महार । जनी म्हणे निर्धार केला संतीं । ७ ।

९७. पंढरीचा वारकरी । त्याचे पाय माझे शिरीं । १ ।
ो कां उत्तम चांडाळ । पायीं ठेवीन कपाळ । २ ।
ंद्य होय हरिहरा । सिद्ध मुनि ऋषेश्वरा । ३ ।
ुखीं नाम गर्जे वाणी । म्हणे नामयाची जनी । ४ ।

९८. आले वैष्णवांचे भारे । दिले हरिनाम नगारे । १ ।
बवघी दुमदुमली पंढरी । कडकडाट गरुडपारीं । २ ।
ाळ मृदंग धुमाळी । रंगणीं नाचे वनमाळी । ३ ।
ऐसा आनंद सोहळा । दासी जनी पाहे डोळां । ४ ।

१९९. स्त्री जन्म म्हणवुनी न व्हावें उदास । साधुसंतां ऐसें केलें जनीं । १ ।
ंतांचे घरची दासी मी अंकिली । विठोबानें दिल्ही प्रेमकळा । २ ।
वेदुर सात्त्विक माझिये कुळीचा । अंगिकार त्याचा केला देवें । ३ ।
विचारितां कुळ गणिका उद्धरिली । नामें सरती केली तिहीं लोकीं । ४ ।
ऋषींची कुळें उच्चारिलीं जेणें । रौरवी तेणें वस्ती केली । ५ ।
नामयाची जनी भक्तीतें सादर । माझें तें साचार विटेवरी । ६ ।

## आत्मस्वरूपस्थिति

२००. सांवळी ते मूर्ति हृदयीं बिंबली । देहो बुद्धि पालटली माझी साची । १ ।
धन्य माझी भक्ति धन्य माझा भाव । हृदयीं पंढरीराव राहतसे । २ ।
धन्य माझा जन्म धन्य माझा वंश । धन्य विष्णुदास स्वामी माझा । ३ ।
आशा तृष्णा कैशा मावळल्या दोन्ही । चित्त विठ्ठलचरणीं जडोनि ठेले । ४ ।
नामयाचे जनी विश्रांति पैं झाली । हृदयीं राहिली विठ्ठलमूर्ती । ५ ।

२०१. वामसव्य दोहींकडे। देखे कृष्णाचें रूपडें। १ ।
आतां खाले पाहूं जरी। चहुंकडे दिसे हरी। २ ।
चराचरी जें जें दिसे। तें तें अविद्याची नासे। ३ ।
माझें नाठवे मीपण। तेथें कैंचें दुजेपण। ४ ।
सर्वांठायीं पूर्ण कळा। दासी जनी पाहे डोळां। ५ ।

२०२. दळूं कांडूं खेळूं। सर्व पाप ताप जाळूं। १ ।
सर्व जिवामध्यें पाहूं। एक आम्ही होउनी राहूं। २ ।
जनी म्हणे ब्रह्म होऊं। ऐसें सर्वांघटीं पाहूं। ३ ।

२०३. चरण विठोबाचे देखिले। साही रिपु हारपले। १ ।
नाहीं नाहीं म्हणती आम्ही। सांगसी त्या लांगू कामीं। २ ।
नाहीं तरी जाऊं देशीं। जनी नामयाची दासी। ३ ।

२०४. वैराग्य अभिमानें फिरविलें जातें। म्हणवोनी याते भाव खुंटा। १ ।
संचित मातृका वैरणी घातली। अव्यक्तिं दळिलीं व्यक्ताव्यक्त। २ ।
नामरूपा आदि दळियेलें सर्व। पीठ भरी देव पंढरीचा। ३ ।
नवल हा देव बैसला दळणीं। नाहीं केली जनी नामयाची। ४ ।

२०५. भ्रांती माझें मन प्रपंची गुंतलें। श्रवण मनन होउनी ठेलें। १ ।
बापें बोधिलें बापें बोधिले। बोधुनी कैसी तद्रुप झाले। २ ।
निजध्यासें कैसा अवघाचि सांपडला। कीं विश्वरूपीं देखिला बाईयांनो। ३ ।
नामयाची जनी स्वयंबोध झाला। अवघाचि पुसिला ठाव देखा। ४ ।

२०६. संतमहानुभाव येती दिगंबर। नम्रतेचें घर विरळा जाणें। १ ।
निवाले मीपण तें जें ठायीं नाहीं। सोहं शब्द सोई तेथें कैंची। २ ।
पाहतां हा कोण दावितां हा कोण। पाहतां दावितां हे खूण विरळा जाणें। ३ ।
नामयाची जनी वस्तु पै झाली। अवघ्यांसी बुडाली परब्रह्मीं। ४ ।

